शिक्षणखात्याचा मंजुरी-क्रमांक : पापुमं/१०९३/१४३७४/मराठी/स(पु) दि. ६-२-१९९३

इयत्ता पाचवी

मराठी

# बालभारती




महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ, पुणे.

प्रथमावृत्ती: १९९३
पुनर्मुद्रण : १९९८



मराठी भाषा समिती :
डॉ. मधुकर आष्टीकर, अध्यक्ष
डॉ. भाऊ मांडवकर, सदस्य
श्री. दया पवार, सदस्य
श्री. व्यंकटेश चौधरी, सदस्य
श्री. नरहर मंद्रुपकर, सदस्य
सौ. प्रतिभा जंगले, सदस्य
श्री. गोविंद नांदेडे, विशेषाधिकारी (मराठी)

चित्रकार : श्री. जयप्रकाश जगताप, पुणे

मुखपृष्ठ : श्री. एस. के. परब

निर्मिती :
श्री. सुनील सांखोळकर, निर्मिती अधिकारी
श्री. नितीन तांबे, निर्मिती सहाय्यक

फोटोसेटिंग : मे.अक्षर फोटोटाईपसेटर, यशोदा सदन, सखाराम कीर मार्ग, मुंबई-४०० ०१६

कागद : ६१ × ८६ सेमी, ६० जीएसएम्, क्रिमव्होव

प्रकाशक :
श्री. पी. वाय. साळवी, नियंत्रक,
पाठ्यपुस्तक निर्मिती मंडळ, मुंबई-४०० ०१८

मुद्रक :
गुरुकृपा फाईन आर्ट
२०६, शिवाई इंडस्ट्रीयल इस्टेट,
कुर्ला-अंधेरी रोड, साकीनाका, मुंबई - ४०० ०७२.

मुद्रणादेश क्रमांक : N/PTG/T.B./168 [0.50]

# प्रतिज्ञा

भारत माझा देश आहे.
सारे भारतीय माझे
बांधव आहेत.
माझ्या देशावर माझे प्रेम आहे.
माझ्या देशातल्या समृद्ध आणि
विविधतेने नटलेल्या परंपरांचा मला अभिमान आहे.
त्या परंपरांचा पाईक होण्याची पात्रता
माझ्या अंगी यावी म्हणून मी सदैव प्रयत्न करीन.
मी माझ्या पालकांचा, गुरुजनांचा
आणि वडीलधाऱ्या माणसांचा मान ठेवीन
आणि प्रत्येकाशी सौजन्याने वागेन.
माझा देश आणि माझे देशबांधव
यांच्याशी निष्ठा राखण्याची
मी प्रतिज्ञा करीत आहे.
त्यांचे कल्याण आणि
त्यांची समृद्धी
ह्यांतच माझे
सौख्य सामावले
आहे.

# प्रस्तावना

'राष्ट्रीय शैक्षणिक धोरण १९८६' अनुसार महाराष्ट्र राज्यात 'प्राथमिक शिक्षण अभ्यासक्रम १९८८' हा तयार करण्यात आला.

या शासनमान्य अभ्यासक्रमावर आधारित मराठी विषयाची इयत्ता पहिली ते आठवीची नवीन 'बालभारती' माला १९८९-९० या शालेय वर्षापासून पाठ्यपुस्तक मंडळ क्रमशः प्रकाशित करत आहे. या मालेतील इयत्ता पाचवीचे पुस्तक आपल्या हाती देताना आम्हांला विशेष आनंद वाटतो.

आकलन व अभिव्यक्ती साधली,की भाषा अवगत झाली,असे म्हणता येते. त्यासाठी श्रवण, संभाषण, वाचन व लेखन ही कौशल्ये आत्मसात करणे अगत्याचे ठरते. पाठ्यपुस्तक मंडळाने या उद्देशानेच गतवर्षी चौथीचे पुस्तक प्रकाशित केलेले आहे. आत्मसात केलेली वरील कौशल्ये अधिकाधिक विकसित करण्याचा उद्देश आता डोळ्यांपुढे आहे.

यापूर्वी इयत्ता पाचवीपासून व्याकरण शिकवण्याकरता व्याकरणाच्या पुस्तकाची स्वतंत्रपणे निर्मिती होत होती; परंतु नवीन अभ्यासक्रमानुसार व्याकरण, पाठ्यपुस्तकातील पाठाच्या आधारेच समजावून दिलेले आहे.

सर्व स्तरांवरील शिक्षक व शिक्षणतज्ज्ञांनी समीक्षणसत्रात केलेल्या सूचनांचा सांगोपांग विचार करून समितीने या पाठ्यपुस्तकास अंतिम रूप दिलेले आहे.

मंडळाची मराठी भाषा समिती व चित्रकार यांच्या आस्थापूर्वक परिश्रमांतून हे पुस्तक तयार झालेले आहे. हे पाठ्यपुस्तक तयार करताना मराठी भाषा समितीला ज्या अनेक साहित्यिकांचे, शिक्षणतज्ज्ञांचे, समीक्षकांचे आणि श्री. व. द. देसाई (निमंत्रित सदस्य) यांचे सहकार्य लाभले, त्या सर्वांचे मंडळ मनःपूर्वक आभारी आहे.

या पाठ्यपुस्तकाचे अध्ययन व अध्यापन दर्जेदार व्हावे यासाठी मंडळाने सदर पाठ्यपुस्तकाची अध्यापनपुस्तिकाही प्रकाशित केली आहे. अध्यापन उद्दिष्टाधिष्ठित होण्यासाठी शिक्षकांनी सदर पुस्तिकेचा अवश्य उपयोग करून घ्यावा.

विद्यार्थी, पालक व शिक्षक या पुस्तकाचे स्वागत करतील, अशी आशा वाटते.

पुणे :
दिनांक : २६ जानेवारी,१९९३
माघ ६, शके १९१४

संचालक,
महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती
व अभ्यासक्रम संशोधन मंडळ, पुणे.

# अनुक्रमणिका

# १. सुंदर हिरवे माळ

सुंदर हिरवे माळ! चहुकडे सुंदर हिरवे माळ! ।। ध्रु. ।।

जमली काळी वर घनमाला<br>
झिम्‌झिम् पाउस खाली आला<br>
ग्रीष्मऋतूचा ताप निवाला<br>
कोंभ येउनी दूर दूरवर पालवले खडकाळ! ।। १ ।।

बोरवनाची सुकली पाने<br>
तरतरली या नवजलपाने<br>
विरळ बाभळी चैतन्याने<br>
स्वानंदाने डुलू लागल्या सकाळ सायंकाळ! ।। २ ।।

समोर इकडे तिकडे भवती –<br>
हलू लागली हिरवी नवती<br>
ओलसरीने पाने दवती<br>
माळावरल्या वनराणीला नजराणाच सुढाळ! ।। ३ ।।

निवली राने, गुरे-वासरे<br>
निवली झाडे, रानपाखरे<br>
धनी अंतरी निवले सारे<br>
शेतकऱ्यांच्या पोटामधला निवेल कधि पण जाळ? ।। ४ ।।



## शब्दार्थ व टिपा

**घनमाला** — ढगांची माळ. **पालवणे** — पाने फुटणे. **चैतन्य** — तजेला. **नवती** — नवी पालवी. **सुढाळ** — तेजस्वी. **निवणे** — शांत होणे.

## स्वाध्याय

१. पाऊस पडल्यानंतर निसर्गात कोणकोणते बदल झालेले दिसून येतात?

२. पावसाचा पशुपक्ष्यांवर कोणता परिणाम झाला?

३. काटेरी बाभळीवर पावसाचा काय परिणाम झाला?

४. ऋतू किती आहेत? त्यांची नावे लिहा आणि कोणत्याही एका ऋतूची वैशिष्ट्ये लिहा.

५. ताप, नजराणा, चैतन्य या शब्दांचा वाक्यांत उपयोग करा.

६. 'पावसाळ्यातील एक रम्य दृश्य' यावर सुमारे पंधरा वाक्यांचा निबंध लिहा.



# २. हिशेब

पहाटे उठल्यापासून रात्री झोपेपर्यंत क्षणाक्षणाचा, कणाकणाचा हिशेब देवाला देणारी एकच व्यक्ती — ती म्हणजे महात्मा गांधी! त्या व्यक्तीत विलक्षण असे आकर्षण होते. गांधीजी जेव्हा हसत तेव्हा त्यांचे ते हसणे माणसाला खिळवून टाकत असे.

१९४४-४५ या वर्षामधला कोणता तरी तो दिवस. ऐन दुपारची दोन ते तीन ही वेळ. नागपुरी उन्हाळा रणरणत असलेला.

निमित्त कोणते हे आता नक्की आठवत नाही, पण मला सेवाग्रामच्या त्यांच्या झोपडीत जायला मिळाले. सेवाग्रामची त्यांची झोपडी अजून जपली गेली आहे.

मी जेव्हा झोपडीत गेलो तेव्हा गांधीजी आपल्याच कामात मग्न होते. त्यांच्याजवळ एका कोपऱ्यात त्यांचे सचिव प्यारेलालजी आपल्या कामात गुंतले होते. मी गुपचूप आत गेलो प्यारेलालजींच्या बाजूला जाऊन बसलो. मी प्यारेलालजींच्या हाती एक पत्र दिले आणि 'मी जातो' अशी खूण केली. प्यारेलालजींनी खुणेनेच 'बैस' असे सांगितले. मी घुटमळत खाली बसलो. कुणीही बोलत नव्हते.

दुपारची अडीच तीनची वेळ असेल. एक उंचपुरे गृहस्थ आत आले. प्यारेलालजींनी त्यांना खूण करून बसायला सांगितले.

त्या वेळी भारताच्या स्वातंत्र्याची लक्षणे स्पष्ट दिसू लागलेली होती. वेळ आणि काळ निश्चित व्हायचा होता. राजकीय पुढाऱ्यांना स्वतंत्र भारताची स्वप्ने पडू लागली होती. साधनशुचित्वावर विश्वास असलेल्या गांधींना स्वप्न नव्हे, तर प्रत्यक्ष स्वातंत्र्य दिसत होते.

त्या वेळी एक कल्पना पुढे आली, की सक्षम आणि श्रीमंत माणसानी खेडी दत्तक घ्यायची. त्या खेड्यांत सर्व सोई स्वखर्चाने उपलब्ध करून द्यायच्या आणि खेड्यांचा विकास साधायचा.

गांधीजींना ही कल्पना रुचली नाही. त्यांचे मत होते, की बाहेरून आलेल्या पैशाची किंमत लोकांना कळणार नाही. लोकांतूनच पै-पैसा मिळाला तर त्याची किंमत त्यांना कळेल आणि मनापासून ते सुखसोईंचा उपभोग घेऊ शकतील.

ते गृहस्थ असलाच काही विचार घेऊन आले असावेत, असा मी तर्क केला. ते भले गृहस्थ निमूट बसून राहिले. आल्या आल्या गांधीजींनी आपल्या चष्म्याच्या वरूनच त्यांच्याकडे बघितले. पुन्हा ते आपल्या लिखाणात मग्न झाले. चारपाच वेळा तरी गांधीजींनी त्यांच्याकडे तसे पाहिले असावे. सारे स्तब्ध. बाहेर ऊन. आठ फूट उंचीची ती झोपडी. विजेचा किंवा हाताचा पंखा नाही. गांधीजींच्या डोक्याला चिक्कणमातीचे पांघरूण. ते आपल्याच कामात दंग. प्यारेलालजीही खाली बघत काही लिहीत असलेले. माझी नजर कधी गांधीजींकडे, कधी प्यारेलालजींकडे, कधी त्या गृहस्थांकडे, अन् कधी धरणीकडे.



दहा-पंधरा मिनिटे गेली. गृहस्थ चुळबुळू लागले. प्यारेलालजींची नजर वर उठताच त्यांनी हातांनी खूण केली– 'मला तहान लागली आहे.' प्यारेलालजींनी काही न बोलता आपले बोट एका कोपऱ्याकडे दाखवले. तिथे एका छोट्या घडवंचीवर एक माठ ठेवला होता. माठाची झिरप झेलायला एक पसरट कटोरी होती. झाकणीवर दोन पेले होते आणि एका पाटीवर लिहिले होते — 'गिलास को मुँह न लगाइये.' त्यांना खरोखरीच तहान लागली असावी. ते गृहस्थ उठले. आवाज न करता एका पेल्याने दुसऱ्या पेल्यात त्यांनी पाणी ओतले. पेला भरून पाणी त्यांनी घशातून आत ओतले. तेवढ्याने तहान भागली नसावी, म्हणून दुसरा पेला त्यांनी भरला. त्यातले अर्धे पाणी पोटात गेले. उरलेले अर्धा पेला पाणी त्यांनी बाहेर जाऊन एका झाडापाशी ओतले. पुन्हा सर्व व्यवस्थित ठेवून, आपण आपल्या हाताने पाणी पिऊ शकतो, असा आविर्भाव आणून ते गृहस्थ एक प्रकारच्या तृप्तीने आपल्या जागी येऊन बसले. गांधीजींनी त्यांना बोलावले.

गृहस्थांनी आपल्या भेटीचा उद्‌देश प्रथम कथन केला. खेडे दत्तक घेण्याची आपली कल्पना व ऐपत स्पष्ट केली. गांधीजींनी शांतपणे त्यांचे म्हणणे ऐकले अन्‌ हसत हसत विचारले—



"आपलं वय किती?"

"बापू, प्रश्न वयाचा नाही. माझी इच्छाशक्ती व काम करण्याची हिंमत कायम आहे."

"तरी सहज विचारतो, तुमचं वय किती?"

"असेल त्रेचाळीस, चव्वेचाळीस."

"म्हणजे तुम्ही तरुणच की!"

"तेच तर मी म्हणत होतो."

"किती दिवसांपासून पाणी पिण्याची सवय आहे?"

"म्हणजे काय?"

"नाही सहज विचारतो. बालपणची काही अजाणती वर्षं सोडली, तर जवळजवळ पस्तीस वर्षं तुम्हांला पाणी पिण्याची सवय आहे."

"म्हणजे काय बापू? मी समजलो नाही."

"बरोबर आहे तुमचं म्हणणं! पस्तीस वर्षं तुम्हांला पाणी पिण्याची सवय आहे, तरीही आपल्याला एका तहानेला किती पाणी हवं, याचा तुम्हांला अंदाज आला नाही. मघाशी मी बघितलं, तुम्ही अर्धा पेला पाणी झाडाला नेऊन टाकलं. त्या पाण्याचा सदुपयोग झाला हे मी कबूल करतो, पण सर्वांना ही सवय असेल, असं मला वाटत नाही. एका तहानेला जर अर्धा पेला पाणी वाया गेलं, तर भारतातील ३०-३२ कोटी लोकांच्या तहानेला पंधरा-वीस कोटी पेले वाया जातील. लोकसेवेचं व्रत जर आपल्याला घ्यायचं आहे, तर आपल्या गरजांचा हिशेब ठेवायला नको का?"

अन् मध्येच थांबून गांधीजी इतके छान हसले, इतके छान हसले, की जणू झाडावरून गार वारा यावा अन् या गार झुळकेने माणसाचे अंतरंगही शीतल, स्वच्छ व्हावे!

**शब्दार्थ व टिपा**

**सचिव** — चिटणीस. **सक्षम** — समर्थ. **ऐपत** — ताकद, शक्ती.

**आविर्भाव आणणे** — आव आणणे. **दत्तक खेडी** — सर्वांगीण सुधारणेसाठी सेवाभावी लोकांनी दत्तक घेतलेली गावे. **साधनशुचित्व** — वापरायची साधने चांगली असणे. (त्यामुळे इतर कुणालाही उपद्रव वा इजा होऊन त्याचे अकल्याण होऊ नये.)

## स्वाध्याय

१. सेवाग्रामच्या आश्रमातील वातावरण कोणत्या प्रकारचे होते?
२. खेडयांचा विकास करण्याविषयी गांधीजींची कोणती कल्पना होती?
३. आलेल्या मनुष्यास गांधीजींनी वेगवेगळे प्रश्न का विचारले?
४. पिण्याचे पाणी वाया जाते, हे गांधीजींनी कसे लक्षात आणून दिले?
५. या पाठाला 'हिशेब' हे शीर्षक योग्य का वाटते?
६. पाणी, वीज व अन्न वाया जाऊ नये, यासाठी दैनंदिन जीवनात तुम्ही कोणती काळजी घ्याल?

## व्याकरण

- पूर्वी घडून गेलेली घटना दर्शवणारा काळ **भूतकाळ** होय. घडत असलेली घटना दर्शवणारा काळ **वर्तमान काळ** तर पुढे घडणारी घटना दर्शवणारा काळ **भविष्यकाळ** होय.
- काळाशी संबंधित क्रिया दर्शवणारा शब्द म्हणजे **क्रियापद.**
- ही क्रिया करणाऱ्या सजीव, निर्जीव कल्पनेने किंवा भावनेने जाणवणाऱ्या वस्तू **नाम** होत. नामे, **पुरुष, स्त्री** किंवा **तदितरवाचक** असू शकतात. त्यानुसार नामाचे **लिंग** ठरते.

# ३. शूरबाला

३० जुलैची रात्रीची वेळ होती. हनीचे वडील रायघरहून कलकत्त्याला जाणार होते, म्हणून हनी आणि तिची आई दोघीही रायघर रेल्वेस्टेशनवर त्यांना पोचवण्यासाठी गेल्या होत्या. गाडी सुटली आणि त्या दोघी घरी जाण्यासाठी निघाल्या.

रात्रीचे नऊ-साडेनऊ वाजले होते. त्यातून मुसळधार पाऊस पडत असल्याने, रस्त्यावर फारशी रहदारी नव्हती. दोघी झपझप घराकडे निघाल्या होत्या. आता त्या रेल्वे हॉस्पिटलच्या समोरच्या रस्त्यावर आल्या. रस्ता निर्मनुष्य होता. एकाएकी कोणीतरी हनीच्या आईवर झडप घातली. दोघींनी घाबरून, चपापून बघितले. ते दोघेजण होते. त्यांनी हनीच्या आईच्या मंगळसूत्रावर झडप घातली. हनीची आई आणि हनी या अचानक हल्ल्याने गांगरल्या, पण घाबरल्या मात्र नाहीत. हनीच्या आईने आपले मंगळसूत्र एका हाताने घट्ट आवळून धरले आणि दुसऱ्या हाताने ती त्या चोराशी झटापट करू लागली. ती त्याला ढकलत होती, मारत होती. आईचे ते शौर्य पाहून हनीलाही बळ आले. तिने पुढे होऊन त्या चोराला दणादण मारायला सुरुवात केली. हनीच्या चिमुकल्या हातांत आता अधिकच शक्ती संचारली.

काय वाट्टेल ते झाले तरी या चोरट्यांना आईचे मंगळसूत्र मिळू द्यायचे नाही असा विचार करून, सारी शक्ती एकवटून ती त्या चोरांशी झटापट करू लागली. दोन दणकट चोर आणि त्यांच्याशी लढा देत होत्या या दोघी — एक बारा वर्षांची चिमुरडी आणि दुसरी तिची आई.

त्या दोघांचा साथीदार तिसरा चोर बाजूला उभा होता. बराच वेळ ही झटापट चालू होती. मंगळसूत्र चोरण्यात आपण यशस्वी होत नाही, हे लक्षात

आलं आणि काय! त्या चोराने झटकन सुरा उपसला आणि हनीच्या आईवर सप् सप् सप् वार केले. आई जखमी झालेली पाहताच हनी चांगलीच चवताळली आणि तिने त्या चोराची कॉलर हाताच्या मुठीत घट्ट आवळली. आता त्या चोरट्याने हनीकडे मोर्चा वळवला. त्याने सप् सप् सप् असे एकापाठोपाठ एक सहा वार हनीवर केले.हनी रक्तबंबाळ झाली. ते पाहिल्या-बरोबर हनीच्या आईचा मंगळसूत्रावरचा हात सैल पडला. मंगळसूत्र आता चोरट्याच्या हातात आले, पण त्याची कॉलर हनीच्या मुठीत होती. बापरे! आता काय करायचे? चोरट्याने मानेला चांगले दोन-तीन हिसके दिले; पण हनीच्या हाताची मूठ काही सैल होईना. सुऱ्याच्या वाराने पोटाला जखमा झाल्या होत्या; रक्ताने फ्रॉक लालभडक झाला होता, पण हनीने धीर सोडला नव्हता. हाताच्या मुठीत तिने त्या चोरट्याच्या सदऱ्याची कॉलर गच्च आवळून धरली होती. हनीची आई रक्तबंबाळ होऊन धरणीवर कोसळली, तशी त्या दोन्ही चोरट्यांनी या तिसऱ्या चोराला खेचले आणि तिघांनीही धूम ठोकली. एका चोरट्याची कॉलर मात्र हनीच्या मुठीतच होती. आपली कॉलर गमावूनच शेवटी त्याला पळ काढावा लागला.

एवढा वेळ त्या चोरांशी मुकाबला करणारी हनी धरणीवर कोसळली. जखमांच्या होणाऱ्या असह्य वेदनांमुळे आता त्या दोघींनीही मोठ्याने आक्रोश करण्यास सुरुवात केली. त्यांचा आक्रोश ऐकून नजिकच्या रुग्णालयामधील काही कर्मचारी धावत आले. जखमी, रक्तबंबाळ अवस्थेतल्या हनीला आणि तिच्या आईला त्यांनी रुग्णालयात दाखल केले. पोलिसांत वर्दी दिली; पण या मधल्या वेळात हनी आणि तिची आई दोघीही बेशुद्ध झाल्या होत्या. उपचार करताना हनीच्या मुठीत डॉक्टरांना कॉलर सापडली. डॉक्टरांनी ती पोलिसांच्या स्वाधीन केली. चोरट्यांविरुद्ध पोलिसांना एक महत्त्वाचा पुरावा मिळाला. कॉलरवर धोब्याच्या दुकानाचा शिक्का होता आणि 'के.बी.' अशी इंग्रजी आद्याक्षरेही होती. आता वेगाने चौकशीची चक्रे फिरू लागली. पोलीस

धोब्याच्या दुकानावर आले. चौकशी करता त्यांना कळले की 'कालाबाबू' नावाच्या माणसाचा तो सदरा आहे.

आता पोलीस कालाबाबूच्या मागावर निघाले.

दुकानदाराने पत्ता दिलेला होताच. त्या पत्त्यावर पोलीस येऊन धडकले. तिथे पोलिसांना दोन व्यक्ती मिळाल्या; पण त्यात कालाबाबू कुणीच नव्हता. खूप चौकशीअंती त्यांनी कालाबाबूचा पत्ता दिला. पोलिसांनी त्या पत्त्यावरील माणसाला पकडले, पण तो कालाबाबू नव्हता तर कालीप्रसाद होता आणि सोबत त्याचा पुतण्या होता गुलाब. त्या दोघांना व पूर्वीच्या पत्त्यावरील दोघांना पोलिसांनी पकडले आणि त्या चौघांनाही घेऊन पोलीस रुग्णालयात आले. एव्हाना हनी शुद्धीवर आली होती.

हनीने पहिल्या दोघांना बरोबर ओळखले; पण कालीप्रसाद आणि त्याचा पुतण्या गुलाब यांच्याकडे बोट दाखवून हनी म्हणाली, "हे दोघे ते चोर नाहीत. तिसरा चोर यांच्यात नाही." आणि बोलता बोलता पुन्हा हनीची शुद्ध हरपली. डॉक्टरांनी ताबडतोब धावपळ केली. उपचाराला सुरवात केली आणि डॉक्टर म्हणाले, "खूप रक्तस्त्राव झाल्याने हनी अशक्त झाली आहे. तिला ताबडतोब रक्त देण्याची गरज आहे." डॉक्टरांचे बोलणे ऐकताच कालीप्रसाद आणि गुलाब पुढे झाले आणि डॉक्टरांना म्हणाले, "डॉक्टर, या मुलीनं आम्ही चोर नाही हे सांगून आमच्यावर उपकारच केले आहेत. आमचं रक्त घ्या आणि तिला वाचवा." डॉक्टरांनी त्या दोघांच्या रक्ताची तपासणी केली. गुलाबचा रक्तगट हनीच्या रक्तगटाशी जुळला म्हणून त्याचे रक्त हनीला देण्यात आले. पोलिसांनी कालीप्रसाद आणि गुलाब या दोघांनाही सोडून दिले; पण हनीने ओळखलेल्या त्या चोरट्यांची मात्र पोलिसांनी कसून उलटतपासणी सुरू केली आणि शेवटी खरी माहिती मिळवली. 'कालाबाबू' बिलासपूरला आहे, असे त्यांनी सांगताच पोलीसपथक बिलासपूरला रवाना झाले. अख्खे बिलासपूर पालथे घालून शेवटी कालाबाबूला अटक करण्यात पोलिसांना यश आले आणि काय आश्चर्य! बिलासपूरचे पोलीस कमिशनर बेहद्द खूश

झाले. कारण कालाबाबू हा एक अट्टल गुन्हेगार होता. गेल्या कित्येक दिवसांपासून पोलिसांना तो हवा होता. त्याच्या टोळीने रेल्वेमध्ये दरोडे घातले होते. लूटमारही केली होती. बिलासपूरच्या लोकांनी त्याचा धसकाच घेतला होता. कालाबाबू पकडला जाताच लोकांनी सुटकेचा निःश्वास टाकला.

या मधल्या काळात हनी आणि तिची आई यांची तब्येतही बरी झाली. जखमा बऱ्या झाल्या आणि तब्बल सहा महिन्यांनंतर त्यांना रुग्णालयातून घरी जाण्याची परवानगी मिळाली. बिलासपूरच्या कमिशनरनी आणि लोकांनी हनीचा आणि तिच्या आईचा सत्कार घडवून आणला. हनीला एक थैली अर्पण करण्यात आली.



एक दिवस हनीच्या कानी गोड वार्ता आली. तिला दिल्लीहून सत्काराचे निमंत्रण आले होते. 'गीता चोप्रा ॲवॉर्ड' देऊन पंतप्रधानांच्या हस्ते तिचा सन्मान करण्यात येणार होता.

अनेक पत्रकारांनी चिमुकल्या हनीला गराडा घातला, तिचे फोटो काढले, मुलाखती घेतल्या आणि विचारले, "हनी, या प्रसंगावरून तू तुझ्या वयाच्या मुलांना काय संदेश देशील?" त्यावर हनी म्हणाली, "साहस हेच खरं जीवन आहे!"

**शब्दार्थ व टिपा**

**वर्दी देणे** — माहिती देणे. **धसका घेणे**— भीती बसणे.

**स्वाध्याय**

१. हनी व तिची आई रात्रीच्या वेळी बाहेर कशाला पडल्या होत्या?
२. रेल्वेस्टेशनवरून येताना हनीवर व तिच्या आईवर कोणता प्रसंग ओढवला?
३. पकडलेल्यांपैकी दोघे चोर आहेत हे कसे सिद्ध झाले?
४. कालाबाबूला पकडताच लोकांनी सुटकेचा निःश्वास का टाकला?
५. हनीचा पंतप्रधानांच्या हस्ते सत्कार कशासाठी झाला?
६. तुम्हांला माहीत असलेला असाच एखादा प्रसंग तुमच्या शब्दांत थोडक्यात वर्णन करा.

---

**व्याकरण**

- पुरुषवाचक नामांना **पुल्लिंगी** नामे, स्त्रीवाचक नामांना **स्त्रीलिंगी** नामे, तर या दोहोहून इतर नामांना **नपुसकलिंगी** नामे म्हणतात.
- वस्तू अनेक असतील तर **अनेकवचन** आणि एकच असेल तर **एकवचन** असे म्हणतात.
- नामाचा एकदा उल्लेख झालेला असेल आणि तोच पुन्हा करायचा असेल तर त्या नामाऐवजी वापरल्या जाणाऱ्या शब्दाला '**सर्वनाम**' म्हणतात.

  जसे : हा, ही, तो, ती, जो, ते.

---

# ४. माझ्या पाठच्या बहिणी

माझ्या पाठच्या बहिणी तुझ्या संगती सोबती
आठवणी पालवती शैशवाच्या.

तुझ्या संगती सोबती मज माहेर भेटले
आणि मनात दाटले काहीतरी.

गडे, आलीस पाहुणी ग्रीष्मी झुळूक वाऱ्याची
आसावल्या मानसाची तृप्ती झाली.

आज भिन्न तुझे गाव तसे तुझे-माझे नाव
परि हृदयीचा भाव तोच राही.

बाळपणाची ममता आंबा पाडाचा मधुर
अजूनही जिव्हेवर रुची त्याची.

तुझे-माझे घरकूल उभे अजून माहेरी
जणू पऱ्यांची नगरी शोभिवंत.

तुझे दाट मऊ केस विंचरले माझे हाती
सुवासिक त्यांची स्मृती अजूनही

तुझ्या संगती सोबती भांडलेही कितीकदा
वाढे भांडून ममता पटे आज.

चार दिवस बोललो आठवणी उजळीत
चिंचा-आवळे चाखीत शैशवीचे.

चार दिवस हिंडलो वेश सारखा करुनी
पुन्हा कुणीही बहिणी ओळखाव्या.

चार दिस विसरलो तू, मी माता नि गृहिणी
विनोदाने हूडपणी बोलताना.

तुझी-माझी ग, ममता वेळ गोड पहाटेची
मना तजेला द्यायची निरंतर.

घरी निघाली पाहुणी टाळते मी तुझी दृष्टी
वाटे, अवेळीच वृष्टी होईल की!



## शब्दार्थ व टिपा

**शैशव** — लहानपण. **जिव्हा** — जीभ. **स्मृती** — आठवण. **वृष्टी** — अश्रूंच्या धारा, पाऊस.

## स्वाध्याय

१. बहिणीच्या भेटीने कवयित्रीच्या मनात कोणकोणते विचार आले?
२. दोन्ही बहिणींच्या हृदयीचा भाव एक आहे असे का म्हटले आहे?
३. शैशवातील कोणकोणत्या आठवणी कवयित्रीला येतात?
४. बहीण जाताना कवयित्री तिच्याकडे पाहण्याचे का टाळते?
५. या कवितेतील 'बाळपणीची ममता आंबा पाडाचा मधुर,' 'चिंचा-आवळे चाखीत शैशवीचे,' या कल्पना स्पष्ट करा.
६. दूरगावी असलेल्या मित्राबद्दलच्या लहानपणीच्या तुमच्या आठवणी थोडक्यात लिहा.

# ५. गोट्या

मी कामावरून घरी येत होतो. वासूनानांच्या दिलखुश हॉटेलसमोर गर्दी दिसली. रोज तेथे वाजणारा फोनो वाजत नव्हता. त्याच्याऐवजी एका मुलाच्या केविलवाण्या किंकाळ्या आणि एका पोक्त माणसाचे तणतणणे मला ऐकू आले. काय प्रकार आहे, तो पाहण्याची मला उत्सुकता वाटली आणि मीही त्या तमासगिरांच्या घोळक्यात शिरलो.

दिलखुश हॉटेलचे मालक वासूनाना हातातल्या काठीने एका दहा-अकरा वर्षांच्या मुलास झोडपत होते. तो मुलगा रडत होता, गयावया करत होता, पण वासूनानांना करुणा येत नव्हती. ते अधिकाधिक तावाने हात चालवत



होते आणि त्यांच्या तोंडाचा पट्टाही सारखा चालूच होता. सभ्य माणसाला ऐकवणार नाहीत अशा शिव्या ते त्या पोराला देत होते.

एका कोवळ्या मुलाला असे झोडपून काढण्याइतके वासूनाना निर्दय कसे होऊ शकले ह्याचे मला आश्चर्य वाटलेच; पण त्यांच्या तडाख्यातून त्या बिचाऱ्या मुलाची सुटका करण्याची बुद्धी, त्या शेकडो बघ्यांपैकी एकालाही होऊ नये ह्याचे मला अधिक आश्चर्य वाटले. मी गर्दीतून पुढे घुसलो आणि त्या मुलाला ओढून आपल्या पाठीशी घालून वासूनानांना म्हटले,

"काय चालवलं आहे हे वासूनाना? तुमच्यासारख्या जाणत्या माणसाला शोभत नाही असं करणं."

"ते कारटं तसलंच आहे. आजपर्यंत खायला घातलं आणि माझंच वाटोळं करायला बसलंय." वासूनानांनी मला उत्तर दिले आणि मुलाकडे वळून ते म्हणाले, "जा, नीघ आता मुलखावर. पुन्हा माझ्या दुकानात पाऊल टाकलंस तर टाळकंच फोडीन."

·वासूनाना आत गेल्यावर मात्र बघ्यांना कंठ फुटला.

"हा वासूनाना म्हणजे राक्षस आहे नुसता!" एकजण म्हणाला.

"चहाच्या पाण्यावर पैसा मिळवून मस्ती चढलीय त्याला." दुसऱ्याने री ओढली.

"पण त्या पोरानं तरी का वागू नये सरळ," एक शिष्ट म्हणाले. "कोण कुत्रा विचारत नव्हता, पण ऐन वेळी वासूनानानंच थारा दिला. कशाला खडे फोडता त्याच्या नावानं उगीच?"

"थारा दिला, पण माराशिवाय एक दिवस सुना गेलाय का? विचारा की तुमच्या ह्या धर्मात्म्याला."

असे एक ना दोन, किती उद्‌गार मला ऐकू आले; पण वस्तुस्थितीचा बोध मात्र झाला नाही.

"मुला, तू कुणाचा? कुठं राहतोस?" मी विचारले.

"मी ह्या हॉटेलातच होतो आतापर्यंत." हुंदके देत देत मुलाने उत्तर दिले.

"तुझं इथं दुसरं कुणी नाही?"

"आपण आहात की!" वासूनानांच्या कैवाऱ्यांनी टोमणा दिला. अशा माणसांचे बोलणे ऐकून न ऐकल्यासारखे सोडून देण्यातच शहाणपणा असतो. मी तसेच केले.

"बरं आहे, चल माझ्याबरोबर," असे म्हणून मी त्या मुलासह घरी निघालो.

घरी आल्यावर मी सारा प्रकार पत्नीला सांगितला. तिलाही त्या मुलाची कीव आली. तिने त्याला एकही अक्षर न विचारता प्रथम तोंड धुऊन येण्यास सांगितले आणि सुमा दशमी खात होती तिच्याजवळच त्याचेही पान मांडले.

"ये बाळ, दशमी खा थोडी," तिने म्हटले.

पानावर बसण्याऐवजी तो दारातच थबकला आणि दाराच्या फळीला डोके टेकून पुन्हा हुंदके देऊ लागला. सुमाच्या आईने जवळ जाऊन ममतेने त्याच्या पाठीवरून हात फिरवला आणि म्हटले, "उगी हं! भिऊ नको तू अगदी. आता काही वासूनाना नाही येत, तुला मारायला."

मुलगा वासूनानांच्या भीतीमुळे रडत नव्हता, तर तिच्या प्रीतीमुळेच त्याचा गळा दाटून आला होता.



तासा दोन तासांत आमच्या घरचे वातावरण त्याच्या अंगवळणी पडले. तो मोकळ्या मनाने वावरू लागला. सुमाची आणि त्याची तर चांगलीच गट्टी जमली. मी रात्री घरी आलो, तेव्हा सुमा आणि तो मजेने हसत-खेळत बसलेली मला दिसली. मी दिसताच सुमा मला येऊन बिलगली आणि म्हणाली, ''बरं का हो दादा, मी किनई ह्या गोट्यावर खंडा केला आज. ह्याला एकदेखील कविता येत नाही म्हणायला!''

मला मोठी मौज वाटली. त्या नव्या पाहुण्याचे नाव मला माहीत नव्हते. रात्री जेवताना ते विचारून घ्यावे असा मी बेत केला होता. पण ते काम सुमाने आधीच उरकून घेतले.

''तुझं नाव गोट्या होय रे?'' मी विचारले.

''होय,'' तो म्हणाला.

''गोट्या, हे हो कसलं नाव दादा! खेळायच्या खड्यांना गोट्या म्हणतात. हा तसला दगड आहे वाटतं?''

''पण माझं खरं नाव काही गोट्या नव्हे सुमाताई! मी शाळेत जात होतो की नाही, तेव्हा माझं नाव विश्वास असं होतं. मग लोक मला गोट्या म्हणू लागले. ते तसं का म्हणू लागले हे मात्र मला माहीत नाही.''

''बरं विश्वास, तुझे वडील कुठं असतात?'' मी विचारले.

माझ्या ह्या प्रश्नानंतर विश्वासने जी हकीगत सांगितली तिने मी आश्चर्यचकित झालो. मला मनस्वी वाईटही वाटले. प्रथम 'वडील' ह्या शब्दाचा अर्थच विश्वासच्या लक्षात येईना. वयाने मोठ्या माणसास वडील म्हणतात, एवढेच त्यास माहीत होते आणि असे वडील असणारे एक काका आपल्याला आहेत असे त्याने सांगितले. वडील म्हणजे 'बाप' अशी मी त्याला जेव्हा समजूत दिली, तेव्हा ' मला वडील नाहीत नि आईही नाही ' असे त्याने उत्तर दिले. प्रत्येक माणसास आईबाप असतात, मग विश्वासलाच ते कसे नाहीत, ह्याबद्दल सुमाने आश्चर्य व्यक्त केले. पण ते

दूर करण्याचे त्या अजाण मुलाला कसे जमणार? तोही सुमाइतक्याच गोंधळलेल्या नजरेने माझ्याकडे पाहू लागला.

"तुझे आई आणि वडील तुझ्या लहानपणीच वारले असतील आणि तुझ्या काका-काकूंनी तुझा सांभाळ केला असेल," अशी मी त्याची समजूत घातली. तेव्हा विश्वास म्हणाला, "काका-काकूंनी माझा सांभाळ मुळीच केला नाही. उलट मला ह्या वासूनानांच्या तावडीत मात्र दिलं," अशी सुरुवात करून त्याला आठवली तशी आणि सांगता आली तशी आपली हकीगत त्याने सांगितली.

साखरप्याजवळच्या एका लहानशा वाडीत त्याच्या काकांचे घर होते. घरात तसे म्हटले तर दारिद्र्य नव्हते. आपल्या मुलांमुलींना काकू चांगले कपडे करी आणि चांगले खायला देई. गोट्याने काही मागितले तर मात्र त्याला मुष्टिमोदक मिळत.

गोट्याने एके दिवशी काकूला न विचारता घरातले गरे घेतले म्हणून तिने पळी तापवून त्याच्या हाताला डाग दिला. गोट्या अगदी कळवळला. त्याच्या त्या रडण्याने शेजारची एक बाई धावत आली आणि तो प्रकार पाहून त्याच्या काकूला म्हणाली, 'भाऊंच्या पैशावर चरता आहात आणि त्यांच्याच लेकराला का भाजता असे? कुठं फेडाल हे पाप? '

ह्या गोष्टीनंतर लवकरच 'चल तुला शाळेत घालतो' असे म्हणून काका गोट्यास घेऊन निघाले. कोल्हापूरच्या स्टेशनावर त्यांची आणि वासूनानांची गाठ पडली. 'आपण फार गरीब, हा भावाचा पोर सांभाळण्याची आपणाला शक्ती नाही, कोणी धर्मात्मा त्याचा भार घेईल तर बरं' असे रडगाणे काकांनी गायले. त्यांची ती दीन मुद्रा आणि गोट्याची असहाय स्थिती ह्यांचा परिणाम वासूनानांवर झाला. त्यांनी गोट्याला ठेवून घेण्याचे कबूल केले. डोळ्यांत पाणी आणल्यासारखे करून काकांनी गोट्यास वासूनानांच्या स्वाधीन केले आणि परत कोकणचा रस्ता धरला.

वासूनाना गोट्यास आमच्या गावी घेऊन आले आणि त्याला शाळेला घालण्याच्या भानगडीत न पडता त्यांनी गिऱ्हाइकांना चहा देण्याच्या आणि कपबशा धुण्याच्या कामावर त्याची नेमणूक केली. बाराखड्या आणि थोडीशी झडती एवढ्यावरच गोट्याच्या शिक्षणाची समाप्ती झाली.

हॅाटेलचा पोऱ्या ह्या दृष्टीने मात्र गोट्या चांगला तरबेज झाला. येथे वाजणाऱ्या प्लेटींतील काही गाणी तो हुबेहूब म्हणून दाखवू लागला. तेथे अड्डा करून असणाऱ्या मोटारड्रायव्हर आणि क्लीनर लोकांच्या गोष्टी त्याला आवडू लागल्या.

वासूनानांनी मार देण्याचा प्रसंग एक-दोन दिवसांआड तरी गोट्यावर येईच. कधी जिनसांची सांडलवंड केल्याबद्दल, तर कधी रस्त्यावरील गमती पाहण्यात दंग झाल्याबद्दल वासूनाना त्याची कणीक मऊ करत. आजच्या त्याच्या शिक्षेचे स्वरूप फारच उग्र होते, कारण आज गोट्याने केलेला गुन्हाही वासूनानांच्या दृष्टीने भयंकर होता.

मोटारची मार्गप्रतीक्षा करत बसलेले काही लोक भूक भागवण्याकरता हॅाटेलात आले. काय काय जिन्नस आहेत, अशी त्यांनी पृच्छा केली. लाडू, चिवडा, चकली, भजी इत्यादी पदार्थांची यादी गोट्याने एका सुरात म्हणून दाखवली.

''ताजी,गरम पुरीभाजी आहे का?'' गिऱ्हाइकाने विचारले.

''हो. किती देऊ?'' गोट्याने विचारले.

''आण एकेक प्लेट,'' गिऱ्हाइकाने मागणी केली.

गोट्याने नेऊन ठेवलेली पुरी शिळी आहे आणि भाजीही गार झाली आहे असे पाहून गिऱ्हाईक म्हणाले, ''अरे, मी गरम भाजी मागितली ना?''

''मग, काल रात्री केली तेव्हा ती गरमागरम होतीच की!''

आत शेव तळत बसलेल्या वासूनानांनी गोट्याचे हे उत्तर ऐकले आणि 'ए गद्ध्या' अशी त्याला हाक मारली.

''ही सातशिळी पुरी कशाला आणलीस?'' दुसरे एकजण म्हणाले.

"काल सकाळी आला असतात तर अगदी कढईतून काढल्याबरोबर पुऱ्या आणून ठेवल्या असत्या आपल्यापुढं."

गोट्याचे उत्तर ऐकताच "हे तुझं आंबोण तुलाच लखलाभ होवो," असे म्हणून सर्व मंडळी आपल्यापुढील ताटल्या बाजूस सारून चालती झाली.

आलेले गिऱ्हाईक गोट्याच्या मूर्खपणामुळे गेले आणि तेही माल उष्टा करून पैसे बुडवून गेले, ह्या दुहेरी अपराधाबद्दल वासूनानांचा राग अनावर न झाला तरच आश्चर्य!

पुढे काय झाले ते आधीच सांगितले आहे.

रात्री जेवताना सुमाची आई म्हणाली, "गोटू, तू आमच्याइथं नेहमी राहशील का?"

गोट्याने क्षणभर भेदरलेल्या दृष्टीने पाहून म्हटले, "मला फिरून घालवून देणार तुम्ही? नका घालवू मला, पाया पडतो तुमच्या." आणि खरोखरच खरकटे हात जोडून त्याने तिला नमस्कार केला. त्याला आपण जेवतो आहो हे भान राहिले नाही आणि हॉटेलातल्या सवयीमुळे त्याला उष्ट्या-खरकट्याचा विधिनिषेधही नव्हता.

"आमच्याइथं राहायचं झालं तर आम्ही सांगू तसं वागलं पाहिजे," मी म्हणालो.

"काय सांगाल ते करीन मी."

गोट्याच्या ह्या आर्जवी उत्तराने तिला त्याची फारच कीव आली. ती म्हणाली, "बरं, राहा हं बाळ तू आमच्या इथं. आणिक तू कामसुद्धा करू नकोस. आणि सुमे, तूही भांडायचं नाही हं गोटूबरोबर."

"पण तो भांडला तर मी बरी गप्प बसेन?"

आपल्या लेकीचा बाणेदारपणा पाहून कोणत्या आई-बापास कौतुक वाटणार नाही?

दुसऱ्या दिवशी सकाळी सुमाबरोबर मी गोट्यालाही उठवले. त्याच्या आजपर्यंतच्या कार्यक्रमात नसलेल्या दात घासण्यासारख्या गोष्टी त्याला

करावयास लावल्या. आंघोळ, नमस्कार झाल्यावर तिने त्यास सुमाबरोबर दूध प्यावयास दिले. त्याने चहा मागितला, पण 'आम्ही चहा पीत नाही. चहा पिणे फार वाईट आहे,' असे त्याला सांगताच तो स्वस्थ बसला.

नंतर त्याला घेऊन मी बाजारात गेलो. त्याला कपडे बेतून शिवावयास दिले. पाटी, पेन्सिल, पुस्तक असे त्याचे दप्तर तयार करून त्याला शाळेत नेले आणि मास्तरांना सर्व हकीगत सांगून त्याची चांगली काळजी घेण्याची विनंती करून मी घरी परतलो.

गोट्या रोज शाळेत जाऊ लागला आणि शिकण्यात त्याला गोडीही वाटू लागली. तो आपले धडे झटपट पाठ करी, त्यावरून त्याची बुद्धी तरतरीत असल्याचे मला आढळून आले. मला मोठी आशा वाटू लागली. गोट्याची गाडी मार्गाला लागलेली पाहून सुमाच्या आईला धन्यता वाटू लागली.

पण चार दिवसांतच माझ्याकडे तक्रार आली, की गोट्या शाळेत फार व्रात्यपणा करतो. आज त्याने एका मुलाच्या तोंडाला शाई फासली.

गोट्या घरी आल्यावर मी त्याला खुलासा विचारला. तो म्हणाला, "तुम्ही मला सांगितलं होतं, की गुरुजी सांगतील ते सर्वांनी निमूटपणे ऐकायचं. आज गुरुजींनी गंपू गोऱ्याला रागावून म्हटलं, 'तोंड काळं कर एकदम.' मधली सुटी होईपर्यंत गंपू तोंड काळं न करता तसाच बसून राहिला. गुरुजींचं सांगणं त्याला ऐकायला लावण्यासाठी मी त्याच्याच दौतीतली शाई त्याच्या तोंडाला लावली. ह्यात माझं काय चुकलं?"

गोट्याच्या ह्या आज्ञापालनाला काय म्हणावे हेच मला समजेना.

### शब्दार्थ व टिपा

**धर्मात्मा** — दयाळू. **दशमी** — दुधात भिजवलेल्या कणकेची पोळी. **मुष्टिमोदक**— बुक्क्यांचा मार. **झडती** — पाढे, गणती. **प्लेट** — फोनोची तबकडी. **व्रात्यपणा** — खोडकरपणा. **सातशिळी** — खूप शिळी. **तोंडाचा पट्टा चालवणे** — दुसऱ्यास लागेल असे सतत बोलणे. **री ओढणे** — म्हणण्याला दुजोरा देणे. **थारा देणे** — आश्रय देणे. **सुना जाणे** — रिकामा जाणे. **खडे फोडणे** — दोष लावणे.

**खंडा करणे** — मात करणे. **कणीक मऊ करणे** —खूप मार देणे. **पृच्छा करणे** — विचारणे. **विधिनिषेध नसणे** — योग्य-अयोग्याचा विचार नसणे. **तोंड काळे करणे** — दृष्टिआड होणे.

## स्वाध्याय

१. 'दिलखुश' हॉटेलच्या मालकाविषयी तेथील बघ्यांनी कोणकोणत्या उलटसुलट प्रतिक्रिया व्यक्त केल्या?

२. लेखकाने गोट्याला आपल्या घरी का आणले?

३. आपली काकू आणि सुमाची आई या दोघींनी दिलेल्या वागणुकींत गोट्याला कोणता फरक जाणवला?

४. गोट्याच्या अंगी आज्ञाधारकपणा होता, हे सांगणारा प्रसंग वर्णन करा.

५. तुम्हांला गोट्या का आवडला ते दहा वाक्यांत लिहा.

६. 'माझ्या बालपणीच्या विनोदी आठवणी' यावर सुमारे पंधरा वाक्ये लिहा.

७. ना. धों. ताम्हनकर यांचे 'गोट्या' हे पुस्तक मिळवून सुटीत सामूहिक वाचन करा.

## व्याकरण

- क्रिया करतो तो **कर्ता.** क्रिया ज्या वस्तूवर किंवा प्राण्यांवर घडते ते **कर्म.** क्रिया दोन प्रकारच्या आहेत. कर्म आवश्यक असलेली क्रिया आणि कर्म नसलेली क्रिया.
- क्रिया पूर्ण होण्यासाठी कर्माची आवश्यकता नसलेली **अकर्मक क्रियापदे,** तर कर्माची गरज असलेली **सकर्मक क्रियापदे.**
- उदा. (१) तो **जगतो.** (२) तो आंबा **खातो.**

  वरील पहिल्या वाक्यातील **जगतो** ही क्रिया पूर्ण होण्याकरता कर्माची गरज नाही. म्हणून ते **अकर्मक क्रियापद** आहे. परंतु दुसऱ्या वाक्यातील **खातो** ही क्रिया **आंबा** हे कर्म असल्याशिवाय पूर्ण होत नाही म्हणून खातो हे **सकर्मक क्रियापद** होय.

- खालील वाक्यांतील कर्ता, कर्म आणि सकर्मक व अकर्मक क्रियापदे ओळखा.

  मी कामावरून घरी आलो.
  
  वासूनानांनी एका मुलाला झोडपले.
  
  मला वाईट वाटले.
  
  मी त्याला जवळ ओढले.
  
  वासूनाना त्यामुळे रागावले. म्हणाले,'ह्याने भजी खाल्ली, म्हणून मी मारले.'





# ६. मौजेचे पोहणे

भिलवडी हे गाव कृष्णाकाठी आहे. कृष्णेच्या दोन्ही डगरींवर असलेल्या शेवरीच्या व इतर झाडांनी तो भाग हिरवागार दिसतो. भिलवडीहून एका मैलावर नदीच्या वरच्या बाजूला औदुंबर आहे. दत्ताचे हे एक प्रसिद्ध स्थान आहे. तेथे नदीला मोठा डोह असल्यामुळे उन्हाळ्यातही भरपूर पाण्याचे मोठे थोरले पात्र पाहण्यासारखे आणि पोहण्यासारखे असते.

मला पोहायला येत होते. विहिरीत मी उंचावरून उड्या मारूनही पोहत असे. आमच्या गावच्या सीमेवरील वारणा नदीतही मी अनेक वेळा पोहलो आहे. पण कुठे लहानशी वारणा नदी आणि कुठे मोठी थोरली कृष्णा नदी!

भिलवडी गावी कृष्णेला एक सुंदर घाट आहे. हा घाट पाहण्यासारखा आहे. काशीला मी गंगेच्या काठचे पुष्कळ घाट पाहिले आहेत; पण हा भिलवडीचा घाट त्या मानाने कितीतरी सरस आहे. हा घाट पेशव्यांचे सेनापती परशुराम भाऊ पटवर्धन तासगावकर यांनी बांधवलेला आहे, असे म्हणतात. घाटाला सुमारे पंचेचाळीस पायऱ्या आहेत; पण या पायऱ्यांची गंमत अशी, की सगळ्या एकाला एक लागून नाहीत. कुठे तीन, कुठे चार, कुठे एक तर कुठे दोन पायऱ्या बांधल्यावर थोडीफार सपाट जागा सोडलेली आहे. नदीच्या पात्राकडच्या शेवटच्या पायरीच्या कडेला डोळा लावून वर पाहिले, तर सपाट जागा दिसतच नाही. एकाला एक लागून साऱ्या पायऱ्याच दिसतात. उलट वरच्या बाजूच्या पहिल्या पायरीवरून खाली पाहिले, तर पायऱ्या असतील असे वाटतच नाही. एकसारखा सपाट उतारच उतार दिसतो. वरच्या पायरीवर ठेवलेला तांब्या खालच्या पायरीला डोळा लावून पाहिल्यास दिसतो आणि तसाच खालच्या पायरीवरील तांब्या वरच्या

पायरीच्या टोकाला डोळा लावल्यास दिसतो. हा घाट हे भिलवडीचे एक भूषण आहे. इतकेच नव्हे, तर तो या गावचा एक संरक्षक तट आहे. भिलवडीला पावसाळ्यात कृष्णेच्या पुराने मोठाच धोका उत्पन्न होतो. पण घाटाने या गावाचा बचाव झाला आहे.

पावसाळ्यात कृष्णेला पाणी येते आणि बराच घाट बुडून जातो. घाटावर एक देऊळ आहे, ते पाण्यात बुडून जाऊन त्याच्याखाली भोवरा पडतो. तेथे गंमत दिसते. हे देऊळ दोन-दोन, तीन-तीन आठवडे बुडून जाते. तेव्हा कृष्णेला महापूर आला आहे, असे समजण्यात येते. नदीकाठालाच असलेल्या शाळेच्या सगळ्या पायऱ्या जवळजवळ बुडतात. गावाच्या पूर्वेला असलेल्या मारुतीच्या देवळात पाणी शिरते. तिथून एका मैलावर असलेल्या माळवाडीच्या व गावाच्या मध्ये ओताचे पाणीच पाणी पसरलेले असते. नाव चालवावी लागते. ओताचे पाणी या मार्गाने साऱ्या रानातून जाऊन पुढे दोन-तीन मैलांवर कृष्णेलाच पुन्हा मिळते. पश्चिमेच्या ओताचेही पाणी असेच पसरते व गावाला बेटाचे रूप येते.

असे झाले म्हणजे ग्रामस्थ कृष्णा नदीची पूजा करतात. काही लोक महापूर पोहायला बाहेर पडतात. कृष्णेचे पाणी सर्वत्र पसरलेल्या अफाट सागरासारखे दिसायला लागते. पाण्याला ओढही खूप असते आणि पाण्यामध्ये लाटाही बऱ्याच उसळत असतात. नदीकाठची घरे वाहून जाण्याचा, एकंदरीने गावाचेच नुकसान होण्याचा धोका निर्माण होतो.

अशा वेळी महापुरात पोहण्याची एकप्रकारे गंमत असते. मोठ्या घाटाच्या बाजूला एक लहानसा घाट आहे. तो बुडून त्यावरचे पाणी गावात शिरलेले असते. तेव्हा भिलवडीची माणसे तिथून पोहायला निघतात. पोहायला लागण्यापूर्वी ही माणसे कधीकधी मातीची दोन-तीन मडकी निशाणे लावून तेथून पाण्यात सोडतात. ही मडकी नेमकी पलीकडच्या बाजूला अंकलखोपच्या हद्दीत म्हसोबा बनाजवळ लागतात. त्यावरून अंकलखोपचे लोक समजतात, की भिलवडीची माणसे आता पोहून येणार आहेत. मग ती

तेथे स्वागताची तयारी ठेवतात, म्हणजे पळकाट्याचे भारे शेकण्यासाठी तयार ठेवतात व हावळा खाण्यासाठी ठेवून देतात. भिलवडीच्या या पोहायला गेलेल्या लोकांना परत येताना, औदुंबरला जाऊन तेथून पोहायला पडावे लागते. या वेळी तेथील दत्ताचे देऊळ बुडून गेलेले असते. त्यावर दोन-तीन पुरुषांहून अधिक पाणी असते. या ठिकाणाहून पोहायला पडलेली माणसे खाली मैलावर भिलवडीच्या घाटावर लागतात.

मीही एकदा या लोकांच्या बरोबर महापूर पोहायला गेलो होतो. त्या वेळी पोटाखाली तांब्याची घागर घेतली होती. अशी पालथी घागर पोटाखाली घेऊन, दोन्ही हात मोकळे सोडून पोहण्याची सवय, भिलवडीतील इतर अनेक लोकांबरोबर मीही केलेली होती. काही लोकांनी पाठीवर भोपळे बांधलेले होते, तर काही लोक सांगडीवर होते. एक नाव घेऊन नावाडीही बरोबर होते. आम्ही सुमारे चाळीस-पन्नास लोक होतो. महापूर पोहणे म्हणजे एक प्रकारचे धाडसच होते, यात शंका नाही. बरेच अंतर पोहून जावे लागत असल्याने हात पाय भरून येतात. मला आठवते, आम्ही पलीकडे अंकलखोपच्या रानात पाय टेकले तेव्हा तेथे थोडा गाळ होता. त्यातून पाय उचलून चालणेही जिकिरीचे वाटत होते. पाणी फार गार असायचे. आमच्यापैकी एक-दोघे तर इतके काकडले होते, की पलीकडे गेल्यावर त्यांना फार शेकावे लागले.



येताना ते नावेतूनच परत आले. लाटाही एवढ्या उसळत, की बरोबरच्या माणसांपैकी एकजण तीन-चार हात वर गेलेला असायचा; तर केव्हा आपणही झरदिशी वरून खाली येत आहोत असे वाटायचे. माझ्या दोन्ही बाजूंना थोड्याच अंतरावर माझे मित्र व काही ग्रामस्थ होते. मी काही घाबरलो नव्हतो.

पाण्याच्या प्रवाहाबरोबर बराच वेळ जायचे असते. मध्ये धार असते तेथे मात्र हात मारून ती धार तोडून पुढे सरकावे लागते. ते जर चुकले तर ठराविक ठिकाणी न लागता खाली लांब जावे लागते. पोहायला पडताना सगळे एका ठिकाणाहून एकापाठोपाठ एक पडताना दिसतात. तरी आत गेल्यावर बरेच लांब पसरतात, मागे-पुढे होतात. काठावर शेकडो लोक पाहायला उभे असतात. त्यांना मोठी मौज दिसते.

आम्ही पोहायला पडल्यावर अंकलखोपला गेलो. तेथे काही मंडळींनी शेकाटा घेतला. मग आम्ही औदुंबरला जाऊन तेथून पुन्हा पाण्यात पडून, भिलवडीच्या घाटावर लागलो. भिलवडी गावच्या रहिवाशांना नदीत पोहण्याचे फारसे काही वाटत नाही, पण मी परका होतो. शिक्षक म्हणून माझ्या रक्षणासाठी आजूबाजूला पोहणारे काही लोक होते. एकंदरीने महापूर पोहण्यात एक प्रकारची मौज असते, यात शंका नाही.



## शब्दार्थ व टिपा

**भोवरा** — मंडलाकार फिरणारे पाणी. **ओत** — ओहळ. **पळकाटी** — कापसाच्या झाडाची वाळकी काटकी. **हावळा** — मक्याचा हुरडा. **सांगड** — पोहून जाण्यासाठी तयार केलेले साधन. **जिकीर** — त्रास. **शेकाटा घेणे** — शेक घेणे.

## स्वाध्याय

१. औदुंबर हे स्थान कशासाठी प्रसिद्ध आहे?
२. भिलवडी गावाला बेटाचे रूप येते म्हणजे काय?
३. महापूर आल्यावर भिलवडी गावचे लोक काय करतात?
४. महापूर पोहण्यासाठी कोणकोणती साधने वापरतात? का?
५. 'महापूर पोहण्यात मौज असते', असे लेखकाने का म्हटले आहे?
६. महापूर पोहून येणाऱ्यांचे अंकलखोपचे गावकरी कसे स्वागत करतात?
७. भिलवडीच्या घाटाचे थोडक्यात वर्णन लिहा.
८. नदी असलेल्या गावाची सहल काढा व तेथील नदीचे वर्णन तुमच्या शब्दांत लिहा.
९. तुम्ही पाहिलेल्या 'महापुरा'ची माहिती पत्राद्वारे मित्राला कळवा.

### व्याकरण

- अनेक वस्तूंत जाणवणारा सर्वसाधारण आकार, गुण, धर्म इत्यादी विचारात घेऊन त्यांचा एक प्रकार दर्शवणारा शब्द **सामान्य नाम** होय.
  जसे : नदी, मुलगा, झाड, पर्वत इत्यादी.
- एका व्यक्तीला किंवा वस्तूला उद्देशून ठेवलेल्या नावाला **विशेष नाम** म्हणतात.
  जसे : गोदावरी, माधव, हिमालय इत्यादी.
- एखादया वस्तूतील डोळ्यांनी न दिसणारा पण इतर ज्ञानेंद्रियांना जाणवणारा भाव दर्शवणारा शब्द **भाववाचक नाम** होय.
  जसे : गोडी, प्रामाणिकपणा, शौर्य, हुशारी इत्यादी.
- खालील वाक्यांतील नामांचे प्रकार ओळखा.
  वारणा नदीत मी पोहलो आहे.
  नको तिथे शहाणपणाचा उपयोग होत नाही, तिथे मौनच पाळलेले बरे.

# ७. आईस पत्र

अमोल सुखदेव राऊत,
आदर्श वसतिगृह,
२९५, भाग्यनगर,
नांदेड - ४३१ ६०१.
दिनांक : २६-१-१९९३.

तीर्थरूप आईस,

शिरसाष्टांग नमस्कार.

तुझं पत्र मिळालं. मी तुझ्यापासून दूर इथं शाळेत शिकायला राहतो आहे, तेही वसतिगृहात, म्हणून तुला काळजी वाटणं साहजिकच आहे. मी क्षणभर डोळ्यांआड झालो तरी तू कासावीस व्हायचीस, हे मी अनुभवलं आहे. आई, पिलांना पंख फुटले, की त्यांनी स्वतःच्या बळावर झेप घ्यायला नको का? शाळा आणि वसतिगृह याबाबत तू काळजी करू नकोस. शाळा चांगली आहे. शिक्षक तळमळीनं शिकवतात. आणि आई, शिकवण्या किंवा 'क्लासेस' लावण्याची गरज नाही. आमचे मुख्याध्यापक आणि शाळेचे व्यवस्थापकदेखील म्हणतात, की 'शिक्षकांनी वर्गात शिकवलं ते विद्यार्थ्यांनी लक्षपूर्वक ऐकून अभ्यास केला, तर शिकवण्या किंवा क्लासेसची गरज का पडावी? शहरांतून ही सोय आहे, पण खेड्यापाड्यांतल्या मुलांनी काय करावं? मागं राहावं?'

आई, वसतिगृहदेखील चांगलं आहे. 'मुलं एकटी राहिली, की अज्ञानामुळं नको त्या सवयींच्या आहारी जातात आणि आयुष्याचं नुकसान करून घेतात.' हे तुझं म्हणणं खरं आहे. पण इथल्या वसतिगृहावर व्यवस्थापकांची कडक निगराणी आहे. शिवाय ते सर्वांना आपुलकीनं

वागवतात. शेवटी आपल्या स्वतःच्या वागण्यावरच हे अवलंबून नाही का? तू आम्हांला संयम शिकवला आहेस. तू केलेल्या संस्कारांमुळं मला तरी नको त्या सवयी लागतील ही भीती बाळगू नकोस. तुझा, तुझ्या मुलावर खूप विश्वास आहे आणि मी त्याला तडा जाऊ देणार नाही.

पण आई, ती. स्व. मामा आणि सौ. मामींना मात्र मी वसतिगृहात राहतो म्हणून वाईट वाटतंय. मी त्यांच्याकडे राहावं अशी त्यांची मनापासून इच्छा आहे. ते म्हणतात, 'मामा, काका, भाचा, पुतण्या ही नाती निर्माण कशाला करायची आणि मानायची? हा दुरावा, हा तिऱ्हाईतपणा, हा परकेपणा नात्यांच्या संबंधांना छेद देणारा आहे.'

परवा मामा मला घरी घेऊन गेले. रविवारची सुटी मी त्यांच्याकडेच घालवली. असो, काळजी करू नकोस. पत्र मात्र असंच वरचेवर पाठवत जा. तुझी भेट झाल्यासारखंच वाटतं पत्र वाचून. तीर्थरूप बाबांना शि. सा. नमस्कार. चि. शिल्पाला अनेक आशीर्वाद. शेजारच्या माधवला स. न. सांग.

कळावे.

तुझा<br>अमोल

सौ. रमाबाई सुखदेव राऊत<br>सहकारनगर,<br>भुसावळ–४२५ २०१.



## शब्दार्थ व टिपा

**व्यवस्थापक** — व्यवस्था पाहणारा. **छेद देणे** — तोडणे. **ती. स्व. (तीर्थस्वरूप)** — आईवडिलांखेरीज वडीलधाऱ्यांना पत्र लिहिताना त्यांच्या नावापूर्वी असे लिहिण्याचा प्रघात आहे. **चि.** — चिरंजीव. **स. न.** — सप्रेम नमस्कार.

## स्वाध्याय

१. आईला काळजी वाटत असेल, असे अमोलला का वाटते?

२. शिकवणी लावण्याची गरज अमोलला का वाटत नाही?

३. वाईट सवयी लागण्याची भीती बाळगू नकोस, असे अमोल आईला का म्हणतो?

४. मामामामींना कशाचे वाईट वाटते, असे अमोल म्हणतो?

५. पत्राच्या शेवटी अमोलने आईला कोणती विनंती केली आहे?

६. 'मला आवडलेले शिक्षक' यावर दहा ओळी लिहा.

७. या पत्राला आईने उत्तर दिलेले आहे, अशी कल्पना करून पत्र लिहा.

---

### व्याकरण

- स्वतःबद्दल, समोरच्यांबद्दल, इतरांबद्दल जी सर्वनामे वापरली जातात, त्यांना **पुरुषवाचक सर्वनामे** म्हणतात.

जसे : मी, आम्ही (प्रथम पुरुषवाचक सर्वनाम)

तू, तुम्ही (द्वितीय पुरुषवाचक सर्वनाम)

तो, ती, ते, त्या (तृतीय पुरुषवाचक सर्वनाम)

उदा. मी क्षणभर डोळ्यांआड झालो, तरी तू कासावीस व्हायचीस.

ते सर्वांना आपुलकीने वागवतात.

वरील वाक्यांतील 'मी' **प्रथम पुरुषवाचक सर्वनाम**, 'तू' **द्वितीय पुरुषवाचक सर्वनाम**, 'ते' **तृतीय पुरुषवाचक सर्वनाम** होय.

- खालील वाक्यांतील पुरुषवाचक सर्वनामे ओळखून त्यांचे प्रकार सांगा.

परवा ते मला घरी घेऊन गेले.

रविवारची सुटी मी त्यांच्याकडेच घालवली.

तू काळजी करू नकोस .

---

# ८. जिद्द हीच दौलत

जयदेव दोन्ही हातांचे तळवे गालांवर टेकवून समोरच्या दालनात फुरंगटून एकटा बसला होता. आईच्या बोलण्याचा त्याला राग आला होता. आई नेहमी त्याला रागवत असे. 'आपण का लहान आहोत? आठव्या वर्गात गेलोय, तरीही आईबाबांचे रागावणे सुरूच!'

विचारात गर्क असलेल्या जयदेवचे लक्ष खोलीत चिवचिवाट करणाऱ्या चिमणा-चिमणीकडे गेले. त्यांनी घरटे बांधण्याचे काम काढले होते. काही वेळातच चिमणी बाहेर गेली अन् गवताची एक काडी घेऊन आली.

जयदेवच्या आजोबांचा मोठा फोटो भिंतीवर लावलेला होता. त्यामागील जागा चिमणीने घरट्यासाठी निवडली होती. घरटे बांधण्यात ती दंग झाली होती. चिमणाही तिला मदत करत होता.

जयदेवचे आजोबा जयकृपा हे स्वातंत्र्यसेनानी होते. त्यांचा चेहरा रुबाबदार होता. अक्कडबाज मिशा, पाणीदार डोळे, पाहतच राहावे असे व्यक्तिमत्त्व!

१९४२ साल उजाडले. 'चले जाव'चा आदेश महात्मा गांधींनी ब्रिटिशांना दिला. देश जागा झाला. स्वातंत्र्यासाठी लोक प्राणांची बाजी लावू लागले. घरादारावर तुळशीपत्र ठेवू लागले. कुणाला क्षणाची उसंत नव्हती. स्वातंत्र्याची चळवळ फोफावली, तसा ब्रिटिशांनी जुलूम वाढवला. गोळ्यांच्या फैरी झडू लागल्या. स्वातंत्र्यवीर धारातीर्थी पडू लागले. कुणाला जन्मभरासाठी तुरुंगात डांबले. जेवढा अन्याय करता येईल तेवढा सुरू होता. उद्देश हाच, की स्वातंत्र्याची चळवळ थांबावी.

जयदेवचे आजोबा चळवळीचे नेते होते. त्यांच्या घरात क्रांतिकारकांची नेहमीच वर्दळ असायची. तिथे कट केला जाई. योजना आखल्या जात.

त्याप्रमाणे अंमलबजावणी होई. अशाच एका प्रसंगी जयकृपा कामी आले. गोळीला बळी पडले.

जयदेवला आजोबांच्या कर्तृत्वाचा इतिहास आठवत होता. त्याचे बाबा जयकृष्ण त्याला तो इतिहास वारंवार सांगत. आईच्या तोंडूनही त्याने आजोबांचे कर्तृत्व ऐकले होते. पण जयदेवला त्या गोष्टीचे कधी आकर्षण वाटले नाही. तो म्हणायचा, 'या गोष्टी ऐकून काय करायचं? आता तर आपण स्वतंत्र आहोत ना? स्वराज्य मिळालं आहे ना?'

जयदेवची वृत्ती धरसोडीची होती. कोणतेही काम तो नेटाने पूर्ण करत नव्हता. मध्येच सोडून देई, त्यामुळे एकाही कामात त्याला यश मिळत नव्हते. कधी कधी खेळात तो हिरिरीने भाग घेई. पण काही दिवसांतच त्याचे लक्ष त्यातून उडून जाई. मग तो अभ्यासावर लक्ष केंद्रित करी. पण तेही काही दिवसच चाले. नंतर तो कागदाच्या, मातीच्या, आगपेट्यांच्या विविध वस्तू करण्यात स्वतःला हरवून टाकी. पण तेही थोडे दिवसच!

जयदेवला वाटायचे आपण वैमानिक व्हावे. विमान चालवावे. लगेच दुसरे मन त्याला ट्रकड्रायव्हर करून टाकायचे. ट्रकड्रायव्हरचा तो ट्रॅक्टर ड्रायव्हर होई. पण त्यातल्या अपघातांची, संकटांची जाणीव होताच तो म्हणायचा, 'आपण साधं प्रवासीच व्हावं. समजा, आपलं विमान कुठं कोसळलं, कोणी चाच्यांनी पळवून नेलं, ट्रक उलटला तर जीव जायचा. त्यापेक्षा मोठेपणी एखादी सुखाची नोकरी करू.'

आणि अशा धरसोड वृत्तीमुळेच त्याची आई अन् प्रसंगी बाबाही त्याला रागे भरत. ते उभयता म्हणायचे, 'अरे, कोणत्याही एका गोष्टीचा पाठपुरावा कर. धरसोड वृत्तीनं तुझं भलं होणार नाही.'

शाळेत वादविवाद स्पर्धा होती. त्यात जयदेवने नाव नोंदवले. आईबाबांकडून वादविवादासाठी चांगली टिपणे तयार करून घेतली. तयारीही सुरू केली. अन् कुठे माशी शिंकली माहीत नाही. त्याने एकाएकी स्पर्धेमध्ये भाग न घेण्याचा निर्णय घेतला. आईला तो बोलूनही दाखवला.

जयदेवच्या या वृत्तीचा आईला राग येणे साहजिकच होते. तिने त्याची चांगली खरडपट्टी काढली. बाबा बाहेरून येताच त्यांच्याही कानांवर ही गोष्ट घालण्याचे तिने ठरवले. म्हणूनच जयदेव समोरच्या खोलीत येऊन दोन्ही हातांचे तळवे गालांवर टेकवून एकटक पाहत एकटाच बसला होता.

चिटुकल्या चिमणीचे घर बांधण्याचे कार्य अव्याहतपणे चालू होते. त्यात खंड पडत नव्हता. तेवढ्यात आई तिथे आली. चिमण्यांचा तो उद्योग पाहून तिला राग आला. स्टुलावर चढून तिने फोटोमागे जमलेला काडीकचरा काढून बाहेर फेकला. 'शु ऽ ऽ क्' करून चिमण्यांना हाकलून लावले.

आईची पाठ वळली अन् पुन्हा चिमणीने काड्या जमवण्याचा उद्योग सुरू केला. तीच जिद्द, तोच उत्साह. जराही खंड नाही.



जयदेव त्या चिमण्यांकडे पाहण्यात रंगला होता. त्याला नवल वाटत होते. कौतुक वाटत होते. काही वेळ गेला असेल, तोच जयदेवचे बाबा आत आले. आल्याआल्याच त्यांचे लक्ष चिमण्यांच्या उद्योगाकडे गेले. ते पुटपुटले, "काय धटिंगण आहेत या चिमण्या! माझ्या वडिलांना त्यावेळची ब्रिटिश सत्ता चळचळ कापत होती. त्यांचा केवढा दरारा! नाव घेतलं की थरकाप होई! अन् ह्या भित्रूट चिमण्या चक्क त्यांच्या फोटोमागं घरटं बांधतात, म्हणजे कमाल आहे!"

"अहो भित्रूट माणसं शूरांच्या आधारानं राहत असतात," जयदेवची आई तेथे येत बोलली. बाबांनी तोपर्यंत त्या फोटोमागील काडीकचरा बाहेर काढला होता. आईने तो बाहेर नेऊन फेकला.

"आं! काय जयदेव महाराज, कसल्या विचारात गढला आहात आपण?" बाबांनी विचारले.

कचरा फेकून परत आलेली आई म्हणाली, "अहो, कोणत्याही कामात जिद्दच नाही त्याला. सगळी धरसोड वृत्ती."

या वेळेपर्यंत चिमणीने पुन्हा काडी काडी आणून, फोटोमागे घरटे बांधणे सुरू केले होते, पूर्वीच्याच जिद्दीने, पूर्वीच्याच उत्साहाने.

तिकडे पाहत जयकृष्ण कडाडले, "अरे, ती इवलीशी चिमणी बघ, पुन्हा पुन्हा जिद्दीनं घरटं उभारते आहे, अन् तू? खरं तर जिद्द हीच माणसाची दौलत आहे."

जयदेवच्या डोक्यात प्रकाश पडला. जिद्द हीच माणसाला मोठी करत असते. तीच खरी दौलत. जिद्दीमुळेच या चिमणीचे घरटे पूर्ण झाले. आणि आई-बाबा हरले.

### शब्दार्थ व टिपा

**गर्क** — मग्न. **हिरिरी** — आवेश. **अव्याहत** — सतत, अखंड. **दौलत** — वैभव, ऐश्वर्य. **बाजी लावणे** — पणाला लावणे. **घरादारावर तुळशीपत्र ठेवणे** —

घरादारासह सर्व सोडून जाणे. **फैरी झडणे** — सारखा मारा होणे. **धारातीर्थी पडणे** — चांगल्या गोष्टीसाठी देह ठेवणे. **कामी येणे** — मृत्युमुखी पडणे. **माशी शिंकणे** — शंका येणे.

## स्वाध्याय

१. 'चले जाव'चा आदेश कोणी व का दिला? त्याचा परिणाम काय झाला?
२. जयदेव धरसोड वृत्तीचा होता, हे कोणकोणत्या गोष्टींवरून दिसून येते?
३. चिमणीची जिद्द कोणत्या प्रसंगातून दिसते?
४. चिमणीची धडपड पाहून जयदेवला कोणता बोध झाला?
५. 'जिद्द हीच माणसाची दौलत आहे', असे का म्हटले आहे?
६. कान या अवयवावर, 'कानांवर गोष्ट घालणे' असा एक वाक्प्रचार आहे. डोळे, नाक, तोंड, हात, पाय यांवर असलेला प्रत्येकी एक वाक्प्रचार लिहा.
७. घरटे तयार करताना येणाऱ्या अडचणींबद्दल दोन चिमण्या परस्परांत बोलत आहेत, अशी कल्पना करून संवाद लिहा.
८. १९४२ च्या आंदोलनाची माहिती मिळवा.
९. 'करेंगे या मरेंगे', 'ब्रिटिशांनो चालते व्हा' यांसारख्या घोषणांचा संग्रह करा.

---

### व्याकरण

- एका सर्वनामाचा दुसऱ्या सर्वनामाशी जर संबंध दर्शवलेला असेल तर त्याला **संबंधी सर्वनाम** म्हणतात.

  उदा. जो करील तो भरील.
  जो जे वांछील तो ते लाहो.

वरील उदाहरणांत जो आणि जे ह्या सर्वनामांचा अनुक्रमे तो आणि ते ह्या सर्वनामांशी संबंध दर्शवलेला आहे. म्हणून ही सर्व **संबंधी सर्वनामे** होत.

- खालील वाक्यांतील संबंधी सर्वनामे ओळखा.
  जो अभ्यास करतो तो परीक्षेत पास होतो.
  जे जे चकाकते ते ते सर्व सोने नसते.
  जी चालते ती गाडी.

# ९. दादू

मी इथे शिकायला आलो होतो. दोन खोल्यांचे घर मिळाले होते आणि मालकातर्फेच दादू नावाचा अनुभवी गडीही लाभणार होता. दादू ही व्यक्ती वरवर पाहिली तर जरा विचित्रच दिसत होती. एक खांदा विचित्र रीतीने उडवत चालण्याची त्याची लकब होती. स्वारीने अंगात नुसता एक फाटका कोट घातला होता. बरे, त्या कोटाला बटणे तरी असावीत! त्याच्या उघड्या छातीवर पिकलेल्या केसांचा एक पुंजका मध्येच उठून दिसत होता, तो पाहून वाळलेल्या गवताची आठवण झाली मला.



वाढलेली दाढी खाजवत तो माझ्याशी बोलू लागला तेव्हा माझ्या मनात आले, या बावळट म्हाताऱ्याला आपण गडी म्हणून ठेवणे महामूर्खपणाचे होईल.

ही बावळट पीडा चुकवायची एक नवीन युक्ती मला सुचली. दादूचा पूर्वीचा पगार फक्त तीन रुपये होता. आता तो चार किंवा पाच रुपये मागेल

आणि तसे मागितले, की तुझ्यासारखा लबाड मनुष्य मला नको, असे आपल्याला सहजच म्हणता येईल.

असा पोक्त विचार करून मी दादूला म्हटले,"मी सांगेन ते काम करावं लागेल तुला."

त्याने मोठ्या आनंदाने मान डोलावली.

"पगार काय घेणार तू?" मी प्रश्न केला.

त्याने हसत उत्तर दिले, "पूर्वी मिळत होता तेवढाच द्या!"

"अरे, पण तेवढा म्हणजे किती?" आता चोर बरोबर सापडणार या कल्पनेने मी हसत हसत विचारले.

"तीन रुपये," दादूने उत्तर दिले.

मी चकित झालो. या अडाणी गड्यातला प्रामाणिकपणा दिसताच माझ्या मनात एक कसली तरी उज्ज्वल छटा चमकून गेली.

मी काहीच बोलत नाही, असे पाहून दादू म्हणाला, "पावणेतीन रुपयांवरसुद्धा राहीन मी साहेब."

ती वाढलेली दाढी, तो सुरकुतलेला चेहरा, उघड्या छातीवरला तो पांढऱ्या केसांचा विचित्र पुंजका ह्या साऱ्या कुरूपतेच्या आड एक वेगळे सौंदर्य आहे असा मला भास झाला.

हा भास क्षणिक नव्हता.

'मी सांगेन ते काम करायला हवं,' असे कामावर ठेवताना मी दादूला बजावले होते; पण मला त्याला काही सांगण्याचा प्रसंगच येत नसे. मी सकाळी उठण्याच्या आधीच गवळ्याच्या घरून तो दूध घेऊन येई. मी उठून चूळ भरायला लागलो, की दादूचा स्टोव्ह फरफरू लागे. मला चहात कमी साखर लागते, हे त्याला दुसऱ्यांदा काही सांगावे लागले नाही. मला काडीचाही त्रास होऊ नये म्हणून तो जी धडपड करी ती पाहिली, की मला आईची आठवण होई.



दादू पंपाने पाणी काढू लागला, की माझ्या मनात येई — या खडकाळ जागेच्या पोटात जसा पाण्याचा झरा आहे, त्याप्रमाणे वरून रुक्ष दिसणाऱ्या दादूच्या अंतःकरणातही प्रेमाचा एक गोड झरा आहे.

दादूने माझी सर्व माहिती केव्हाच काढून घेतली होती! पण स्वतःविषयी मात्र तो फारसा बोलत नसे. एकदोनदा रंगात येऊन त्याने आपली थोडीफार माहिती मला सांगितली होती.

त्याचा मुलगा माझ्याएवढाच होता. सोलापूरला कुठल्याशा गिरणीत होता तो. दादूच्या खेड्यातला जमिनीचा एक तुकडा सावकाराकडे खूप दिवस गहाण पडला होता. म्हातारपणामुळे शेती होईनाशी झाली, तेव्हा बायकोला घेऊन तो इथे आला आणि त्याने मुलाला सोलापूरला पाठवले. फार उशिरा झालेला एकुलता एक मुलगा होता तो त्याचा. ''तुम्ही आई बाप सोलापूरला मुलाकडेच का राहत नाही?'' म्हणून मी त्याला विचारले. तेव्हा त्याने उत्तर दिले, ''आम्ही दोघं सोलापूरला गेलो, की तिथं पोराचा खर्च वाढणार. मग तो सावकाराकडली जमीन सोडवून कशी घेणार? बायको इथं कडधान्याची मोड विकून चार पैसे मिळवते. सोलापुरात ती काय करणार? तिथं मोड खपतात

की नाही कोण जाणे. नि सोलापुरात इथल्यासारखी कॉलेजं नाहीत, तेव्हा माझ्यासारख्या म्हाताऱ्याला तिथं कोण काम देणार?"

"पण मुलावाचून कसं करमतं रे तुला?"

"न करमायला काय झालं साहेब? तुम्ही नाही का आलाय आईवडिलांना सोडून. तसाच माझा मुलगा मला सोडून गिरणीत गेलाय. मी इथं तुमचं काम करतोय ना, सोलापुरात अशीच कुणीतरी म्हातारी त्याला जेवायला घालत असेल."

तीन महिन्यांत दादूची नि माझी कमीत कमी तीन वर्षांची ओळख आहे असे वाटू लागले.

क्रिकेट जोरात सुरू झाल्यामुळे कित्येकदा रात्री आठ वाजेपर्यंत मी बिऱ्हाडी येत नसे. पण मला कितीही उशीर झाला तरी ओट्यावर अंधारात दादू माझी वाट पाहत बसलेला असे. एखाद्या दिवशी मला यायला उशीर झाला नि डब्यातला भात निवून गेला, तर दादू लगेच स्टोव्ह पेटवायला उठे. थंडगार झालेला भात स्टोव्हवर तापवला, म्हणून त्याला ऊनउनीत भाताची



गोडी कशी येणार? पण दादूने ऊन केलेला तो भात खाताना मला फार गोड वाटे. त्या गोडीचा उगम अन्नात नव्हता, दादूच्या मनात होता.

एका रविवारी दादूची स्वारी क्रिकेटच्या मैदानावर दिसली, तेव्हा तर मी थक्कच झालो. रात्री मी त्याला विचारले, तेव्हा म्हातारा लाजेने अगदी चूर झाला. पण थोड्या वेळाने त्याने ते कारण सांगितले. आदल्या दिवशी मी फार चांगला खेळलो होतो. दादू सकाळी खाणावळीत डबा आणायला गेला, तेव्हा तिथल्या विद्यार्थ्यांत माझ्या पराक्रमाच्याच गोष्टी चालल्या होत्या. त्या ऐकून दादूला वाटले, आपल्या साहेबांच्या खेळाची सारे लोक इतकी स्तुती करतात तेव्हा आपणही तो पाहावा.

सप्टेंबरच्या शेवटच्या आठवड्यात बाहेरगावी एक सामना ठरला. जहागीरदार नावाचा माझ्याच कॉलेजातला एक मित्र आमचा कप्तान होता. माझी फलंदाजी नि त्याची गोलंदाजी. असा धुव्वा उडवला आम्ही दुसऱ्या बाजूचा!

परत येताना मी जहागीरदारच्या गाडीमध्ये बसलो. गाडी हाकणे आणि सामन्याच्या गप्पा मारणे या दोन गोष्टींपैकी अधिक बेफामपणे तो कोणती गोष्ट करत होता, हे सांगणे फार कठीण होते.

खेळताना मनुष्याला भान नसते. त्यामुळे खेळाच्या श्रमाने माझे अंग किती आंबून गेले आहे, याची कल्पना गाडीत बसेपर्यंत मला आली नाही. मग मात्र अंग ठणकू लागले.

माझ्या बिऱ्हाडापाशी गाडी येताच मी उतरू लागलो, तेव्हा जहागीरदार म्हणाला, "आमच्या बंगल्यावर चल की."

मी म्हटलं. "माझ्याच खोलीवर आपण चहा घेऊ."

"चहा!" तो मोठ्याने हसत म्हणाला.

"मग काय मागवू?"

“बीअर,” तो शांतपणे म्हणाला. दादू ते ऐकत होता.

मी विचारात पडलो, ते पाहून जहागीरदारने दादूला बीअर आणायला सांगितले.

सापावर पाय पडावा तसा दादू दचकला आणि भूत दिसले तर मनुष्य ज्या दृष्टीने त्याच्याकडे पाहील, त्या दृष्टीने तो माझ्याकडे बघू लागला.

मी म्हटले, “अगदी धावत जा! जहागीरदारला हवी आहे.”

“तो जहागीरदार असेल, नाहीतर राजा असेल. तुम्हांला मी दारू आणून देणार नाही.”

मी हळूच म्हटले, “दादू, या महिन्याला तुला एक रुपया जास्ती देईन. मुकाट्यानं जा नि —”

“एक सोडून शंभर रुपये दिलेत तरी —”

दादूने माझी नोट फेकून दिली.

मी संतापाने म्हटले,“नोकरीवर ठेवलं तेव्हा, मी सांगेन ते काम करायचं कबूल केलं होतंस तू. आताच्या आता गेलास तर बरं आहे. नाही तर—”

“नाही तर माझी नोकरी जाईल. होय ना? नमस्कार साहेब, असली कामं करून जगण्यापेक्षा पोटात काटे भरीन, पण—”

त्याचा आवाज घोगरा झाला होता. डोळेही भरून आले होते. पुढे एक शब्दही न बोलता तो चालू लागला.

माझी मलाच लाज वाटू लागली. मी धावत गेलो. दादू फाटक उघडत होता. मी त्याचा हात धरून म्हटले, “दादू, कुठं चाललास?”

“तुमच्या आईसाहेबांकडं!”

“माझ्या आईकडं!”

“हो!”

“कशाला?”

“त्यांच्या झाडाला कीड लागलीय हे सांगायला!”

रागीट स्वराने मी उद्गारलो, "मी वाटेल ते करीन. तुला काय करायचं त्याच्याशी?"

"मला काय करायचं? मला माझ्या मुलाला सांभाळायचंय."

"तुझा मुलगा तर सोलापुरात आहे?"

"होय साहेब, तिथं तो काही भलतं-सलतं करायला लागला, तर त्याच्याजवळ असलेल्या म्हाताऱ्यांनी त्याला आवरायला नको का? तिथं लोकांनी त्याला सांभाळायला हवं. मग इथं मी —"

त्याच्या डोळ्यांतून घळघळ पाणी वाहू लागले.

त्याच्या पाठीवरून हात फिरवत मी म्हटले, "रडू नकोस दादू. तुझी नोकरी कायम आहे."

"नोकरीकरता मी रडत नाही साहेब. तुमच्याऐवजी माझा मुलगा दारूच्या गुत्त्यात दिसला असता तर मला जेवढं दुःख झालं असतं, तेवढं मघाशी तुम्ही दुकानावर जायला सांगितलं, तेव्हा झालं."

दादूचा हात धरून मी त्याला घरात नेले.

मी खोलीत गेल्याबरोबर जहागीरदार म्हणाला, "कुठं गेला होतास?"

"बाहेर तारवाला आला होता."

"तार? कुणाची तार आली बुवा या वेळी?"

"आईची. फार आजारी आहे ती!"

मी घाईघाईने ट्रंक उघडली, खुंटाळ्यावरचे कपडे काढले आणि सामानाची बांधाबांध करू लागलो.

जहागीरदार म्हणाला, "बरं, मी जातो हं.'

त्याला दारापर्यंत सोडून परत आलो. दादू एखाद्या लहान मुलाप्रमाणे हसत उभा होता.

**शब्दार्थ व टिपा**

**लकब** — सवय. **पोक्त विचार** — अनुभवातून सुचलेला विचार. **आंबून जाणे** — श्रमाने थकणे. **पोटात काटे भरणे** — वाटेल ते खाऊन पोट भरणे.

## स्वाध्याय

१. दादूला गडी म्हणून ठेवू नये, असे लेखकाला का वाटले?
२. अडाणी गड्यातला प्रामाणिकपणा कोणत्या प्रसंगाने स्पष्ट झाला?
३. लेखकाला दादूची धडपड पाहताच आईची आठवण का होई?
४. दादू नोकरी सोडून का निघाला होता?
५. जहागीरदारापासून लेखकाने कशी सुटका करून घेतली?
६. दादू स्वतःच्या मुलाजवळ का राहत नव्हता?
७. दादूचे व्यक्तिचित्र तुमच्या शब्दांत लिहा.
८. खालील विधानांचे स्पष्टीकरण करा.
   (१) त्या गोडीचा उगम अन्नात नव्हता, दादूच्या मनात होता.
   (२) 'असली कामे करून जगण्यापेक्षा पोटात काटे भरीन!'
   (३) कुरूपतेच्या आड एक वेगळे सौंदर्य आहे.
९. दादूने असे का केले?
   (१) कमी पगारावर राहणे पसंत केले.
   (२) स्वतःच्या मुलाजवळ राहणे टाळले.
   (३) लेखकाच्या आईकडे जाण्यास निघाला.
   (४) लहान मुलाप्रमाणे हसू लागला.

### व्याकरण

- प्रश्न विचारण्यासाठी वापरली जाणारी सर्वनामे **प्रश्नार्थक सर्वनामे** होत.

उदा. ताजमहाल कोणी बांधला?
शिवाजी महाराजांच्या आईचे नाव काय होते?
सिंह कोठे आहे?

वरील उदाहरणांत **कोणी, काय व कोठे** या सर्वनामांनी प्रश्न विचारलेले आहेत, म्हणून या सर्वनामांना **प्रश्नार्थक सर्वनामे** म्हणतात.

- खालील वाक्यांतील प्रश्नार्थक सर्वनामे ओळखा.

तुम्ही आईबाप सोलापूरला मुलाकडेच का राहत नाही?
दादू,कुठं चाललास?

# १०. विज्ञानयुगाची नांदी

दिवस कालचा आज संपला, प्रभा उद्याची दिसली रे।
विज्ञानाचे युग हे आले, चला स्वागता सामोरे ।।

कार्यसिद्धिला नवस कशाला ? मांसाचा नैवेद्य कशाला?
देहाची जाळून पालवी, जागरणे-उपवास कशाला?
अंधपणाची टाका पोथी, भविष्य अपुल्या हाती रे ।
विज्ञानाचे युग हे आले, चला स्वागता सामोरे ।।

व्याधींचा चुकवण्यास हल्ला, वास्तुशांतिविन टिकण्या इमला।
भूगोलाचे गमक जाणुनी, अवकाशाच्या नवशोधाला ।
कुणी न उरला दुसरा आता विज्ञानाविन वाली रे।
विज्ञानाचे युग हे आले, चला स्वागता सामोरे ।।



करा बुद्धिची आता ऐरण, आणि विवेके घालावे घण ।
कसोटीत ह्या उजळुन घ्यावा, जुना-नवा तो विचार आपण ।
विज्ञानाच्या नव्या युगाची, असे हीच ती नांदी रे ।
विज्ञानाचे युग हे आले, चला स्वागता सामोरे ।।

## शब्दार्थ व टिपा

**प्रभा** — प्रकाश, तेज. **कार्यसिद्धी** — कार्यपूर्ती. **अंधपणा** — अज्ञान.
**व्याधी** — आजार. **गमक** — लक्षण. **विवेक** — सारासार विचार.

## स्वाध्याय

१. कार्यसिद्धीसाठी कोणत्या व्यर्थ गोष्टी न करण्याचे आवाहन केले आहे?
२. विज्ञानाविन कुणी वाली नाही, असे कवी का म्हणतो?
३. विज्ञानाच्या नव्या युगाची नांदी कोणती?
४. भारताने अंतराळात सोडलेल्या अवकाशयानांची माहिती शिक्षकांकडून मिळवा.

## व्याकरण

- नामाबद्दल विशेष माहिती सांगणारा शब्द जर गुणवाचक असेल, तर त्या शब्दाला **गुणविशेषण** म्हणतात.

उदा. **चांगली** मुले सर्वांना आवडतात.
**हुशार** विद्यार्थी शाळेचे भूषण होत.
वरील वाक्यांतील **चांगली, हुशार** हे मुलांबद्दल आणि विद्यार्थ्यांबद्दल विशेष माहिती देणारे शब्द गुणवाचक आहेत,म्हणून ती **गुणविशेषणे** होत.

- खालील वाक्यांतील गुणविशेषणे ओळखा.

त्याने अंगात फाटका कोट घातला होता.
त्याच्या उघड्या छातीवर पिकलेल्या केसांचा पुजका उठून दिसत होता.
खडकाळ जागेच्या पोटात पाण्याचा झरा आहे.

# ११. मित्रप्रेम

## (दृश्य १ ले)

(द्वारकेमधील श्रीकृष्णाचा राजवाडा. देवडीवर रखवालदार उभे आहेत. सुदामा प्रवेश करतो.)

**देवडीवाला —** कोण आहे?

**सुदामा —** मी एक गरीब ब्राम्हण आहे.

**देवडीवाला —** गरीब ब्राम्हण असलास, तर एखाद्या धर्मशाळेत जा. हा राजवाडा आहे!

**सुदामा —** मला राजाशीच बोलायचं आहे.

**देवडीवाला —** तुझ्यासारख्या माणसाशी महाराज बोलत बसले, तर त्यांना राज्यकारभार करायला फुरसतच मिळायची नाही.

**सुदामा —** कृपा करून माझा निरोप त्यांना पोहोचवा. मला भेटायचं आहे त्यांना.

**देवडीवाला —** भेटायचं आहे ते भिक्षेसाठी ना! भल्या गृहस्था, महाराज दीनांचे कैवारी आणि उदार दाते आहेत हे खरं; पण द्वारकेत येणाऱ्या याचकांसाठी त्यांनी वेगळं दानमंदिर बांधलं आहे. तिथं जा, म्हणजे हवं ते मिळेल तुला.

**सुदामा —** मला दान नको आहे; मला दर्शन हवं आहे.

**देवडीवाला —** दर्शन हवं असेल, तर द्वारकाधीशांची स्वारी दोन प्रहरी राजसभेला जाते, तेव्हा रस्त्यात उभा राहा. होईल दर्शन.

**सुदामा —** राजाचं दर्शन नको आहे मला. मित्राचं दर्शन हवं आहे.

**देवडीवाला —** कोण तुझा मित्र? आणि तो इथं राजाकडे कशाला आला?

**सुदामा —** राजा हाच माझा मित्र आहे.



**देवडीवाला —** (मोठ्याने हसतो.) महाराज तुझे मित्र! द्‍वारकेचे सम्राट तुझ्यासारख्या भणंग भिकाऱ्याचे मित्र! हाऽ हाऽ!

**दुसरा देवडीवाला —** अरे! या राजवाड्यातील आचारी-पाणकेदेखील तुझ्यासारखे दहा ब्राम्हण पदरी ठेवू शकतील आणि तू महाराजांचा मित्र?

**पहिला देवडीवाला —** तू राजवाड्यात गेलास तर तुझा हा फाटका-तुटका आणि मळका वेश पाहून तेथील नोकरचाकरसुद्‍धा तुझ्या वाऱ्याला उभे राहायचे नाहीत.

**दुसरा देवडीवाला —** आणि तुझ्या अंगाला इतकी धूळ लागली आहे, की राजवाड्याची जमीन स्वच्छ ठेवण्यासाठी दोन नोकरांना कुंचे घेऊन तुझ्यामागं फिरावं लागेल. (दोघेही हसतात.)

**पहिला देवडीवाला —** पण नाव काय तुझं ?

**सुदामा —** माझं नाव सुदामा. मित्रहो! आपण मला आत सोडत नाही याचा मला राग नाही; पण आपण श्रीकृष्णमहाराजांकडे नुसता निरोप पाठवला तरी मी आपला आभारी होईन आणि हेही शक्य नसेल, तर मी माघारी जातो.

**पहिला देवडीवाला —** थांब! थांब! दाराशी आलेला याचक माघारी गेला असं महाराजांना समजलं, तर रागावतील ते. मी आत वर्दी देऊन येतो. (एक दूत प्रवेश करतो.)

**दूत —** वर्दी देण्याची जरुरी नाही. महाराजांनी सुदामदेवांना राजमहालात येण्याची विनंती केली आहे.

**पहिला देवडीवाला —** विनंती केली? पण महाराजांना कसं कळलं हे!

**दूत —** सुदामदेव येत असल्याचं त्यांना सौधावरून दिसलं. ते वाट पाहत आहेत. यावं आचार्य!

**दुसरा देवडीवाला —** म....म.... महाराज,आम्हांला क्ष.... क्षमा करा.

**सुदामा —** क्षमा कसली करायची! तुमचं काम तुम्ही केलं. तुम्ही त्यात काहीही चुकला नाही. (स्वतःशी) खरोखर देवडीवरून माघारी जाताना मला फारशी खंत वाटली नसती. आता कृष्णाच्या महालात जाताना मात्र माझी छाती धडधडत आहे.

## (दृश्य २ रे)

(श्रीकृष्णाचा महाल : रुक्मिणी व श्रीकृष्ण बोलत आहेत.)

**रुक्मिणी —** इतका कसला आनंद झाला आहे आज? अगदी लहान मुलासारखं धावत पळत महालात येऊन बसलात?

**श्रीकृष्ण —** मी आज पुन्हा लहान झालो आहे खरा. बाळपणचा मित्र फार दिवसांनी आला, म्हणजे बरोबर बाळपण घेऊनच येतो.

**रुक्मिणी —** कोण मित्र हा?

**श्रीकृष्ण —** सुदामदेव. आता सौधावरून तुला दाखवलं नाही का?

**रुक्मिणी —** तो दरिद्री ब्राम्हण तुमचा मित्र? मला वाटलं कोणी तरी भिकारी आला आहे आणि त्याला दान देण्यासाठी तुम्ही असे आत आला!

**श्रीकृष्ण —** खरी मैत्री अशा भेदाभेदांच्या पलीकडे असते. तो पैशानं गरीब असेल; पण मनानं श्रीमंत आहे. आपल्यापेक्षाही श्रीमंत आहे.

**रुक्मिणी —** मग आपलं सद्भाग्यच आपल्याकडे चालून आलं म्हणायचं.

(दूत येतो.)

**दूत —** सुदामदेव.

(सुदामा दारात येऊन उभा राहतो. राजमहालातील वैभव पाहून तो घाबरून जातो. पुढे जावे की न जावे या विचारात तो उभा असताच, श्रीकृष्ण आपल्या आसनावरून उठतात व धावत पुढे येऊन सुदामाला आलिंगन देऊन त्याचा हात धरतात.)

**श्रीकृष्ण —** ये, मित्रा ये. असा दूर उभा का? माझी ओळख तर विसरला नाहीस ना?

**सुदामा —** सारं त्रिखंड जग ओळखतं आपल्याला, महाराज! मग मी कसा आपल्याला विसरेन?

**श्रीकृष्ण —** अरेरे! तू ओळख विसरलास हेच खरं. विसरला नसतास तर 'आपल्याला' आणि 'महाराज' असे दुराव्याचे शब्द तुझ्या ओठावर



आलेच नसते. खरंच माझी कल्पना होती, मला पाहताच तू कृष्ण-कान्हा म्हणून मला हाक मारशील.

**सुदामा —** (कृष्णाच्या खांद्यावर हात ठेवून) कृष्णा, फार फार आनंद वाटला तुझ्या भेटीनं!

**श्रीकृष्ण —** आता तरी ओळख पटली. ये असा आत. आसनावर बैस.

**सुदामा —** या आसनावर? कृष्णा, हे वैभवशाली आसन या दारिद्र्यानं कलंकित होईल. तुझ्या या महालात पाय टाकण्याची मला लाज वाटते. चल, आपण बाहेरच्या बागेत एखाद्या झाडाखाली बसू घटकाभर.

**श्रीकृष्ण —** शाबास! मोठा झालास तो फक्त वयानं. पूर्वीसारखाच लाजाळूचं झाड आहेस अजून. सुदामा, माझ्या आसनाची काळजी करायला इथं पुष्कळ लोक आहेत. तो भार तू आपल्या शिरावर घेऊ नकोस. बैस असा इथं. ही माझी पत्नी राणी रुक्मिणीदेखील आपल्या



दिराला भेटायला आतुर झाली आहे.

**रुक्मिणी —** होय भाऊजी! आपण अगदी निःसंकोच बसावं.

**सुदामा —** ठीक आहे. (आसनावर बसतो.)

**रुक्मिणी —** घरची सर्व माणसं कुशल आहेत ना! माझी वहिनी, माझे सर्व पुतणे ठीक आहेत ना?

**सुदामा —** होय! होय! सर्व कुशल आहेत.

**श्रीकृष्ण —** कृष्ण किती खादाड आहे हे तू वहिनीला सांगितलं नाहीस वाटतं? माझ्यासाठी काहीच नाही दिलं तिनं?

**रुक्मिणी —** गेलात पुन्हा गोकुळच्या वळणावर. लहानपणच्या सवयी काही अजून सुटत नाहीत.

**श्रीकृष्ण —** तू थांब ग! मित्रा, काहीच का आणलं नाहीस माझ्यासाठी?

**सुदामा —** होय. आणलं आहे; पण —

**श्रीकृष्ण —** पण काय? कुठं आहे ते —

**सुदामा —** या-या उपरण्याच्या गाठीत आहे; पण छे— तुला देण्यासारखं नाही ते. तू आता एवढा मोठा राजा झालास! माझ्या उपरण्यातले हे मूठभर पोहे तुला द्यायला माझा धीरच होत नाही.

**श्रीकृष्ण —** (हर्षाने) पोहे! शाबास! मला वाटलंच, माझ्या आवडीचं तू काहीतरी आणशील म्हणून. आण, आण ते गाठोडं इकडे!

**सुदामा —** पण-पण—

**श्रीकृष्ण —** पण नाही आणि परंतु नाही. माझे पोहे मला मिळायलाच पाहिजेत! (पोह्याची पुरचुंडी घेऊन पोहे खाऊ लागतो.)

**रुक्मिणी —** अर्ध्याची वाटेकरीण इथं उभी आहे, हे विसरू नये.

**श्रीकृष्ण —** (मिटक्या मारीत) वाहवा! ह्या पोह्यांची सर स्वर्गातील अमृतालाही येणार नाही. घे! (दोघेही पोहे खातात.)

**रुक्मिणी —** खरंच, अशी मेजवानी कुबेराच्या घरीही मिळणार नाही!

**सुदामा —** (डोळ्यांत पाणी येते.) कृष्णा, मी खरोखर आज धन्य झालो!

माझ्या कंगाल घरातले पोहे तुझ्या प्रेमानं गोड झाले. तुझ्या मित्रप्रेमाला खरोखर मर्यादा नाही. तुझ्या प्रेमापुढं इंद्राचं ऐश्वर्यसुद्‌धा तुच्छ आहे. मी जातो आता.

**रुक्मिणी —** अशी आल्याबरोबर जाऊ द्यायची नाही मी. आत चलावं आपण.

**श्रीकृष्ण —** चल बाबा, काय करतोस! घराबाहेर मी स्वामी असलो तरी घरात हिची सत्ता आहे. जे पुढे येईल त्याला तोंड दिल्याशिवाय आता गत्यंतर नाही.

(सगळे आत जातात.)

## (दृश्य ३ रे)

(सुदामाच्या गावाजवळील रस्ता)

**सुदामा —** (स्वतःशी) काहीतरी मागावं म्हणून कृष्णाकडे गेलो, पण त्याच्या प्रेमामुळं कसलंच भान शिल्लक राहिलं नाही. आता घरी गेल्यावर पुन्हा दारिद्र्याशी झुंज घेत बसायचं. माझी पत्नी डोळ्यांत प्राण आणून माझी वाट पाहत असेल. माझी भुकेली मुलं माझ्या वाटेकडे डोळे लावून बसली असतील! काय सांगू त्यांना—अरे, हे काय! ही कसली गर्दी? हे तुताऱ्या-शिंगांचे आवाज कशासाठी? राजा किंवा सरदार आमच्या गावी येत आहे असं वाटतं. — पण हे सारे माझ्याकडे येत आहेत. (नागरिक येतात.)

**एक नागरिक —** महाराज, आपल्याला प्रणाम असो. सुदामदेवांचा जयजयकार!

**सुदामा —** (आश्चर्याने) मला प्रणाम? माझा जयजयकार? कशाकरता?

**नागरिक —** आपण या नगराचे राजे आहात.

**सुदामा —** मी राजा? मित्रहो, तुम्हांला काही तरी भ्रम झालेला दिसतो. तुम्ही ज्याची प्रतीक्षा करता तो मी नव्हे! मी या नगरात राहणारा गरीब ब्राम्हण आहे. मला वाट द्या. माझी मुलंमाणसं वाट पाहत असतील.

**नागरिक —** महाराज, तीही इथं आपल्या स्वागतासाठी आली आहेत. या पाहा राणीसाहेब!

(सुदामाची पत्नी व मुले, राणीच्या व राजपुत्रांच्या पोशाखात येतात.)

**सुदामा —** राणीसाहेब? होय—कोण या? अरे, ही तर माझी पत्नीच दिसते आहे; पण हिच्या अंगावर ही भरजरी वस्त्रं आणि अलंकार कोठून आले? ही माझी मुलं. तीसुद्धा ओळखू येईनाशी झाली. मला वाटतं मी स्वप्नात आहे. हे खरं नाही.

**सुदामाची पत्नी —** महाराज, हे सारं खरं आहे. भगवान श्रीकृष्णाच्या कृपेचा प्रसाद आहे. आपण येण्यापूर्वीच महाराजांचे स्वार इथं आले आणि या शहराचं राज्य आपल्याला दिल्याची त्यांनी द्‌वाही फिरवली. आपल्यासाठी अपार धनदौलत त्यांनी आणली आहे.

**सुदामा —** (गहिवरून) कृष्णा—कान्हा! माझ्या मूठभर पोह्यांची,ह्या माझ्या प्रेमाची—केवढी परतफेड केलीस ही!

## शब्दार्थ व टिपा

**दीनांचे कैवारी** — गरिबांची बाजू घेणारे. **दाता** — देणारा, उदार. **द्‌वारकाधीश** — द्‌वारकेचा राजा, कृष्ण. **सौध** — उंच गच्ची.

## स्वाध्याय

१. सुदामाला देवडीवाल्यांनी का अडवले?
२. सुदामाने देवडीवाल्यांना ओळख पटवण्याचा कसा प्रयत्न केला?
३. सुदामाला महालात येण्याची भीती का वाटली?
४. कृष्णाने मित्रप्रेमाची परतफेड कशा प्रकारे केली?
५. या पाठास दुसरे शीर्षक सुचवा.
६. श्रीकृष्ण व सुदामा सांदीपनीच्या आश्रमातून घरी जाताना परस्परांचा निरोप घेत आहेत, अशी कल्पना करून त्यांचे संभाषण थोडक्यात लिहा.
७. या पाठाचा नाट्यप्रयोग सादर करा.

# १२. मुलांचे शिक्षण

आमचा संसार ठीक चालला होता. मी घरचे करून मुलाबाळांचा अभ्यास करून घेत असे. कर्वे कॉलेजमधून आले, की हिंगण्यास जात व तेथे शिकवत. सर्व सुरळीत चालले होते. इतक्यात कर्व्यांच्या मनात एक मोठी लाट आली ती ही, की आपण कॉलेजच्या कामाचा राजीनामा देऊन सर्व वेळ आश्रमाचेच काम करावे. खर्चाला लागेल तो पैसा इतरांपेक्षा कमी घ्यावा, म्हणजे त्यांना कुरकुर करता येणार नाही.

हा त्यांचा विचार मला समजताच मी त्यांची न रागवता कानउघाडणी केली. मी म्हणाले, 'अहो, वीस वर्षे काम झालं, की पेन्शन मिळेल व शिवाय संस्थेमार्फत उतरवलेली तीन हजार रुपयांची पॉलिसी पण मिळेल. कुटुंबाची थोडी सोय होईल. अर्धंच काम सोडून का देता? तुम्हांला ही मानाची भाकरी मिळत असता ती टाकून मला दुःख का देता? तिथं काम



करून फावला वेळ खुशाल आश्रमाचं काम करा. घरातली काही काळजी नको. मी सर्व पाहते.  घर सांभाळून मीपण तुम्हांला होईल ती मदत करीन.'

असे होता होता कॉलेजातली वीस वर्षे संपली. आता पेन्शन स्वतः न घेता, त्याचा विनियोग न्यू इंग्लिश स्कूलच्या स्टुडंट्स फंडाकडे करावा,असा विचार त्यांच्या मनात येऊ लागला. तोच माझी कुरकुर सुरू झाली, 'वीस वर्ष चाकरी करून कमी पगार घेतला. त्यामुळे पैसा नाही, घर नाही, काही नाही. उद्या काम करवत नाहीसं झाल्यावर मी काय करू? आपल्या मुलांचं शिक्षण वगैरे कसं होणार?' परंतु एक वर्षभर त्यांनी पैसे दिलेच. पुढे पेन्शन न घेण्याचा हा विचार त्यांनी सोडला आणि आतापर्यंत वडील मंडळींच्या आशीर्वादाने माझे सर्व काही उत्तम चालले आहे.

कर्वे हे हिशोबाला चोख खरे, पण पैसा नसेल तर आपल्या मुलाबाळांचे पुढे कसे होईल असा विचार त्यांनी कधी केला नाही. एकदा तर त्यांनी स्वतः उतरलेला पाच हजार रुपयांचा विमा आश्रमाच्या नावे करून दिला. ते मला अगोदर काहीच माहीत नव्हते. ही बातमी मी वर्तमानपत्रांतून वाचली. आपल्याला जरा जास्त पैसा असावा, मुलाबाळांना काही कमी पडू नये असे कोणत्या आईला वाटणार नाही? पण हे असे इतरांनाच पैसे देत व आपल्या मुलांचा कधी विचार करत नसत. ह्या गोष्टीचा मला मनातून राग येई. पण काय करणार? माझ्यावर काही बरावाईट प्रसंग आला नाही, हे माझे महाभाग्य असो किंवा मी अडल्यादुबळ्याला माझ्याकडून होईल तेवढी मदत करते त्याचा मोबदला म्हणून असो; पण आतापर्यंत कोणत्याही गोष्टीत कमी पडले नाही, हे खरे.

कर्व्यांना पैसा काही अफाट मिळत नसे आणि जो काय मिळे तोसुद्धा घरच्यापेक्षा लोकांना व संस्थांना देण्यात जाई. त्यामुळे माझी घरी फार त्रेधा उडे. पण मीही चंगच बांधला होता, की काय पडेल ते काम करीन, पण मुलांना वर आणीन. त्यासाठी घरचे एकूण एक काम मीच घरी करी. शिवाय कोणाची बाळंतपणे वगैरे करून थोडाबहुत पैसा मिळे. तसेच एका श्रीमंत

मुलीला आमच्या घरी ठेवली होती. तिचे सर्व करण्याबद्दल मला खर्चाचे पैसे मिळत. ह्या मुलीला प्रथम आश्रमातच ठेवायची होती, कारण कर्वे हे तिचे विश्वस्त होते. तिच्या वडिलांनी तीन विश्वस्त नेमले होते, पण इतर दोघांनी विश्वस्त होण्याचे नाकबूल केल्याने तिची जबाबदारी कर्व्यांवरच आली. ती नेहमी आजारी असे. तिला कायमचा खोकला होता. तिला हिंगण्यात बरे वाटेना, तेव्हा कर्वे मला म्हणाले, 'तू ठेव हिला आपल्यापाशी.'

मी विचार केला, हिला कमीत कमी बारा-तेरा वर्षे तरी सांभाळावे लागेल. तिची व्यवस्था पाहणाऱ्या विश्वस्ताला वर्षाचे चारशे रुपये मिळायचे होते. तेव्हा ही जगली वाचली तर आपल्याच मुलांच्या शिक्षणाला पैसे मिळतील, अशा आशेनेच मी त्या अशक्त मुलीच्या अनेक खस्ता खाल्ल्या. आता ती मुलगी चांगली मोठी झाली असून आपल्या स्वतःच्या बंगल्यात राहत असते.

माझे सर्वच मुलगे विलायतेला कसे गेले? इतके पैसे कर्व्यांनी आणले तरी कुठले? असाही प्रश्न कानांवर येतो. पण कर्व्यांनी फक्त एका मुलाकरता डॉक्टरीच्या शिक्षणाचा खर्च केला व तोही कर्ज म्हणून केला. वर सांगितलेली वर्षाची चारशेची रक्कम बारा-तेरा वर्षे कर्व्यांना मिळाली म्हणूनच हे कर्ज तरी फेडतां आले. शंकरने डॉक्टर झाल्यावर पैसे परत केले. त्यांतून दुसऱ्याला जर्मनीला जायला पैसे कर्जाऊ दिले व त्याने ते परत केल्यावर तिसरा इंग्लंडला गेला.

हल्ली माझ्या नातवंडांकडे पाहिले, की मला वाटते, 'अरे, आपण आपल्या मुलांना काहीच देऊ शकलो नाही.' मुलांना नेहमीच हौस असते, की नवीन नवीन कपडे घालावे; खेळ, नाटक, संगीत यांत मन रमवावे, बरोबरीच्या लोकांत खेळावे. मुले घरी केव्हातरी तसे म्हणत. मित्रांचे नवे कपडे पाहून तसे मागत. खेळ पाहायला जायला पैसे मागत. तेव्हा मी म्हणे, 'अरे, तुम्हांला परवा दिलेना पैसे? आता दिवसभर कसले मागता? त्याच पैशांचे कांदे आणले तर चार दिवस चांगली गोड भाजी होते. खेळाचं काय?

आपल्या कॉलेजचं, न्यू स्कूलचं गॅदरिंग होतं तेव्हा तुम्हांला बघायला सापडतंच, तेवढं पुरे.'

कपड्यांच्या बाबतीत मी त्यांची समजूत घाली,' कपड्यांचं काय घेऊन बसलात? तुम्ही चांगले व्हा. कपड्यांनी काही कुणाला शोभा येत नाही. तुमच्या वडिलांना पगार कमी म्हणून तुम्हांला कपडे कमी करते. पण तुम्हांला खायला-जेवायला तर कमी नाही ना करत? तुम्ही फक्त श्रीमंतांकडे बघता. तुमच्या शाळेतली इतर मुलं पाहा, आणि तुम्हांला ठाऊक आहे ना, की वीस वर्षांपर्यंतच कर्वे तुमच्या शिक्षणासाठी खर्च करणार आहेत. तोपर्यंत तुम्हांला बी. ए. झालंच पाहिजे. तुमचे वडील तुम्हांला माहीतच आहेत. म्हणतील ते करतील. तर अभ्यासात जास्त लक्ष द्या. तुम्ही मिळवायला लागल्यावर तुम्ही कितीही कपडे करा.'

मुलांना लहानपणी ह्या गोष्टींचे वाईट वाटे. अजूनही जेव्हा त्यांना पूर्वीची आठवण होते तेव्हा ते आमच्याशी भांडतात व आम्हांला दोष देतात. त्यांना सर्व मनाप्रमाणे देता आले नाही ह्याचे मलाही वाईट वाटते.कधी गप्पा मारत बसलो,की ह्या मनातल्या गोष्टी निघतात. मी म्हणते, ' तुमच्या लहानपणी मी तुम्हांला कधीच आनंद वाटण्याजोगं दिलं नाही.'

मग मुले दुसऱ्या बाजूने असेही म्हणतात, ' बाया, अग आणखी काय द्यायचं? जे खरं द्यायला हवं होतं ते तुम्ही दिलेलं आहेच. आम्हांला तुम्ही जितकं दिलंत तितकं फारच थोडे आईबाप देतात.' पण ते काही तितके मनापासून नाही. त्या आपल्या एकमेकांच्या समजुती चालतात झाले. पण आपल्या मुलांच्या हौशी पुरवता आल्या असत्या तर, असे मनात आल्यावाचून राहत नाही.

अशा रीतीने बरीच काटकसर व अंगमेहनत करून, एकाला स्कॉलरशिप मिळून, मुलांचे उत्तम शिक्षण झाले. ते सर्व चांगल्या ठिकाणी, चांगल्या तऱ्हेने कामे करत आहेत. त्यांचे संसार सुखाने व आनंदाने चालले आहेत. ते

पाहून इतके दिवस केलेल्या तपश्चर्येचे फळ परमेश्वराने मला दिले, असे वाटते व ऊर आनंदाने भरून येतो.

## शब्दार्थ व टिपा

**स्टुडंट्स फंड** — विद्यार्थी कल्याण निधी. **विश्वस्त** — एखाद्या व्यक्तीची अथवा संस्थेची मालमत्ता सुरक्षितपणे सांभाळणारा. **कान उघाडणी करणे** — स्पष्टपणे चूक दाखवून देणे. **चंग बांधणे** — कसून प्रयत्न करणे. **खस्ता खाणे** — भरपूर कष्ट सोसणे.

## स्वाध्याय

१. कर्वे यांनी कॉलेजचा राजीनामा देणे योग्य नाही, असे लेखिकेला का वाटले?
२. लेखिकेने कोणकोणती कामे करून कुटुंबासाठी आर्थिक मदत मिळवली?
३. कर्वे यांनी आपल्या मुलांच्या शिक्षणासाठी कोणता मार्ग अवलंबला?
४. आपल्या मुलांना आपण काहीच देऊ शकलो नाही, ही खंत लेखिकेला का वाटते?
५. या पाठातून कर्वे यांच्या कोणत्या गुणांचा प्रत्यय येतो?
६. महर्षी धोंडो केशव कर्वे यांच्या 'हिंगणे स्त्री-शिक्षण संस्थे'ची माहिती मिळवा.

## व्याकरण

- नामाबद्दल विशेष माहिती सांगणारा शब्द संख्यावाचक असल्यास त्या शब्दाला **संख्याविशेषण** म्हणतात.

उदा. **पाच** पांडव **शंभर** कौरवांशी **अठरा** दिवस **दुप्पट** जोमाने लढले.

वरील वाक्यांत पाच, शंभर, अठरा व दुप्पट हे शब्द अनुक्रमे **पांडव, कौरव, दिवस** व **जोम** या नामांविषयी विशेष माहिती सांगतात व ते संख्यावाचक आहेत, म्हणून त्यांना **संख्याविशेषणे** म्हणतात.

- खालील वाक्यांतील संख्याविशेषणे ओळखा.

'अहो, वीस वर्षे काम झालं की पेन्शन मिळेल, शिवाय तीन हजार रुपयांची पॉलिसी पण मिळेल.'

'अर्धंच काम सोडून का देता?'

मी विचार केला, हिला कमीत कमी बारा-तेरा वर्षे तरी सांभाळावे लागेल.

# १३. अन्योक्ती

[१]

येथे समस्त बहिरे बसतात लोक
का भाषणे मधुर तू करिशी अनेक,
हे मूर्ख यांस किमपीहि नसे विवेक
कोकीळवर्ण बघुनी म्हणतील काक.

[२]

नको धावु, बा चातका, मेघ नाही,
धुराचा असे लोट हा नीट पाही,
न या सेविता तूज पाणी मिळेल,
तुझ्या मात्र डोळ्यांतुनी ते गळेल.

[३]

वनी विलसती बहू विविध वृक्ष चोहीकडे,
तयांत मज चंदनासम न एकही सापडे,
जयास न दिली फळे न कुसुमेहि दैवे जरी,
शरीर झिजवूनि तो परि परोपकारा करी.





## शब्दार्थ व टिपा

**अन्योक्ती** — आडून बोलणे, एक अर्थालंकार. **किमपीहि** — थोडेसुद्‌धा.

## स्वाध्याय

१. कोकिळांन्योक्तीतून कवीने कोणाला कोणता संदेश दिला आहे?
२. या कवितेमध्ये 'तुझ्या मात्र डोळ्यांतुनी ते गळेल' असे कवीने का म्हटले आहे?
३. चंदनान्योक्तीतून कवीला काय सुचवायचे आहे?
४. मधुर फळे किंवा सुगंधी फुले असलेल्या चार वृक्षवेलींची नावे लिहा.

## व्याकरण

- नामाबद्‌दल विशेष माहिती सांगणारा शब्द जर सर्वनाम असेल, तर त्याला **सार्वनामिक विशेषण** म्हणतात.

उदा. **हा** कागद.
**तो** मनुष्य.
**ती** शाळा.

या उदाहरणांत हा, तो, ती ही सर्वनामे आहेत व ती विशेषण म्हणून वापरलेली आहेत. अशांना **सार्वनामिक विशेषणे** म्हणतात.

# १४. भामरागड

महाराष्ट्रात गडचिरोली हा एक जिल्हा आहे. या जिल्ह्यात अनेक मागासलेल्या आदिवासी जमाती आहेत. त्यांमध्ये माडिया हे सर्वांत जास्त मागासलेले आहेत. ते या जिल्ह्याच्या भामरागड परिसरात राहतात.

भामरागड म्हणजे जंगलचा प्रदेश. या जंगलात बाबा आमटे वयाच्या पंधराव्या वर्षी प्रथम गेले होते. अनेक दिवस ते तेथे रानोमाळ भटकत होते. तेव्हापासून त्यांना ध्यास लागला होता, की माडियांमध्ये येऊन राहावे. त्यांचे दुःख, दारिद्र्य, अज्ञान नाहीसे करण्यासाठी काम करावे.

बाबांचे हे स्वप्न भामरागडच्या जंगलात हेमलकसा या खेड्यात त्यांचा मुलगा डॉ. प्रकाश आणि त्याचे मित्र यांनी आज साकार करून दाखवले आहे.

हेमलकसा येथील प्रत्येक माणसाच्या डोक्यावर मृत्यूची टांगती तलवार सतत लटकत असते. कधी हा मृत्यू विषारी नागाच्या रूपाने पायात घुटमळत असतो; कधी अस्वलाच्या रूपाने भेडसावत असतो, तर कधी हाच मृत्यू पुराचे पाणी होऊन, तर कधी वणवा होऊन ज्वाळांच्या जिभल्या चाटत धावून येतो. पण येथील लोकांचा खरा शत्रू आहे विषारी मलेरिया. भामरागडच्या जंगलात साधा मलेरिया तर बारा महिने थैमान घालतच असतो; पण विषारी मलेरिया प्रत्यक्ष मृत्यू होऊनच वावरत असतो. या मलेरियाचे जंतू थेट मेंदूत शिरतात. पाहता पाहता माणूस बेशुद्ध होऊन खाली कोसळतो, आचके देऊ लागतो, खूप ताप येतो आणि लवकरच उपचार न झाल्यास रोगी दगावतो.

पण या सर्व अडचणींवर धैर्याने मात करण्यासाठी तेथे 'हेमलकसा लोकबिरादरी' नावाची संस्था स्थापन केली आहे. त्या संस्थेचे तरुण कार्यकर्ते शेती, शिक्षण आणि आरोग्य या तीन क्षेत्रांत काम करत आहेत. या

कार्यकर्त्यांपैकी कुणी प्राध्यापकी सोडून, कुणी दीड-दोन हजार रुपयांच्या पगारावर लाथ मारून, तर कुणी साऱ्या मोहपाशावर पाणी सोडून येथे आले आहेत. हे तरुण सपत्नीक येथे राहत आहेत. ते शेतीत राबतात, दवाखान्यात काम करतात. शाळेत शिकवतात. त्यांच्या पत्नी या कामात त्यांना साथ देतात.

माडियाला ना नांगरणे ठाऊक होते, ना जमिनीची मशागत ठाऊक होती. पाऊस पडला, की कोसरी, वरीसारखे बी हाताने जमिनीवर फेकायचे, उगवेल ते गोळा करायचे. भाज्या तर त्याला ऐकूनही ठाऊक नव्हत्या. हेमलकसा लोकबिरादरी त्यांना आता शेती शिकवते, पालेभाज्या व फळभाज्या पिकवण्याचे शास्त्र शिकवते आणि बी-बियाणेही पुरवते. भाज्यांनी माडियाच्या अन्नाला चव तर आली आहेच; पण शिवाय मुलांच्या व मोठ्यांच्या पोषणाला तो आहार पूरक ठरला आहे.

हेमलकसा येथे शाळा सुरू करायचे ठरवले, तेव्हा मुले मिळवण्यापासून अडचणी होत्या. कार्यकर्ते या परिसरातल्या जवळजवळ प्रत्येक गावी गेले. तेथील लोकांच्या सभा, बैठका घेतल्या. प्रत्येक कुटुंबातून, निदान वस्तीतून एकेक मुलगा आम्हांला द्या, आम्ही त्याची जबाबदारी घेतो असे सांगितले. आम्ही त्याला अक्षरे वाचायला शिकवू, पुस्तके वाचायला शिकवू, असल्या आश्वासनांचा मोह माडियांना नाही, हे कार्यकर्ते ओळखून होते. म्हणून त्यांनी लोकांना सांगितले, की आम्ही त्याला जमीन कशी कसायची, बी कसे पेरायचे हे शिकवू. रोप कसे लावायचे, भाजी कशी पिकवायची हे सांगू. आम्ही तुमच्या मुलाला औषध कसे ओळखायचे, कोणते औषध कोणत्या आजारावर द्यायचे हे शिकवू. हा मुलगा आमच्या शाळेतून परतेल तेव्हा तो तुमच्या गावाला शेती शिकवील. तुमच्या गावात छोटासा दवाखाना चालवील. आम्ही त्याला जरुरीची औषधे देत जाऊ; या सांगण्याचा उपयोग झाला. ह्या बिरादरीने तेथे शाळा स्थापन केल्या आणि अनेक वस्त्या मुले शाळेत पाठवायला तयार झाल्या.

येथील शाळेत मुले सकाळी वर्गात शिकतात. मग त्यांना सुतारकाम, लोहारकाम, शिंपीकाम असे पुढेही त्यांच्या जीवनात उपयोगी पडणारे धंदेशिक्षण दिले जाते. दुपारी त्यांना जेवण देण्यात येते. मग मुले शेतावर जातात. तेथे बांध घालण्यापासून शेतीची प्रत्येक गोष्ट त्यांना शिकवली जाते. लोकबिरादरीने तेथे दवाखानेही उघडले आहेत. रोग्यांवर इलाज आणि थोडेफार औषधोपचार यांचे शिक्षण देण्यास ते उपयोगी ठरलेत. थोड्या मोठ्या तरतरीत दोन मुलांना हे औषधोपचाराचे शिक्षण दिले जाते. आलेल्या रोग्यांच्या जखमा कशा धुवायच्या, साध्या कापडाचे बँडेज कसे बांधायचे येथपासून वेगवेगळ्या रोगांची लक्षणे काय असतात, त्यांना काय म्हणतात, हेही त्यांना शिकवले जाते. कोणते उपाय घरी करता येतात, कोणते उपचार करण्यासाठी रोग्याला दवाखान्यात न्यायला हवे यावी माहिती दिली जाते. काही मुले शिकून आता इतकी तयार झाली आहेत. की ती ड्रेसिंग करतात,



ठराविक औषधे अचूक काढून अचूक प्रमाणात देतात आणि ती कशी घ्यायची हे रोग्याला समजावून सांगतात.

पूर्वी माडिया औषधे घेत नसत. रोगांवर औषध असते हेच त्यांना ठाऊक नव्हते. कुणाला काही झाले, की ते पुजाऱ्याकडे जात आणि कोंबडे, बकरे कापत. हेमलकसा येथे दवाखाना उघडल्यावर कार्यकर्ते गावोगाव फिरून लोकांना औषध घेतल्याने आजारी माणूस बरा होतो हे सांगू लागले. मग दबकत दबकत लोक येऊ लागले.

पुजाऱ्यांना या कार्यकर्त्यांचा सुरुवातीला राग वाटे. कारण माडियाला लुबाडण्याचा त्यांचा मार्ग दवाखान्यामुळे बंद होणार होता. माडिया भोळाभाबडा व श्रद्धाळू असतो. ताप आला, की तो पुजाऱ्याकडे जाई. मग पुजारी म्हणे, 'ताप उद्या जाईल. कोंबडे कापू.' पाळीचा ताप असल्याने तो अचूक दुसऱ्या दिवशी जाई. कोंबडे पुजाऱ्याच्या पदरात पडे. तिसऱ्या दिवशी



माडियाला ताप आला, की पुजारी म्हणायचा, 'तू पुन्हा पाप केलंस, पुन्हा कोंबडं काप.'

दवाखाना, औषधोपचार यांस पुजाऱ्यांचा असलेला हा विरोध जेव्हा त्यांच्याच जिवावर बेतले तेव्हा मात्र मावळला. एका पुजाऱ्याची मुलगी विषारी मलेरियाने बेशुद्‌ध झाली, तेव्हा त्याचा धीर सुटला. दवाखान्यात डॉक्टरांनी उपचार करून असे रोगी वाचवल्याचे त्याला ठाऊक होते. तो मुलीला दवाखान्यात घेऊन गेला. त्याची मुलगी तेथील उपचारांनी वाचली आणि तो डॉक्टरांचा भक्तच बनला. आता विषारी मलेरियाचे आचके दिसले, की पुजारीच रोग्याच्या नातेवाइकांना रोग्याला डॉक्टरकडे न्यायला सांगतात.

डॉ. प्रकाश आमटे आणि त्यांच्या पत्नी डॉ. सौ. मंदा येथील दवाखान्यात काम करत आहेत. त्यांच्या हातात औषध, डोळ्यांत करुणा, हृदयात प्रेम आणि निष्ठा भरून राहिली आहे. भामरागडच्या जंगलातील लोकांचे अज्ञान व व्याधी यांच्या अंधारात त्यांनी एक उजळती पणती स्वतःच्या जीवनाचे तेल घालून लावली आहे. पावसाळ्यात गळ्यापर्यंत असलेल्या नाल्याच्या पाण्यातून चालत चालत किंवा प्रचंड पूर आलेल्या नदीतून पोहत पोहत डॉ. प्रकाश जेव्हा रोगी तपासायला जातात तेव्हा कृतज्ञ माडियाला अश्रू आवरत नाहीत.

या प्रकल्पाने माडियांच्या अनेक अंधश्रद्‌धा उखडून टाकल्या आहेत. कोंबडे कापल्याशिवाय विहिरीला पाणी लागत नाही, अशी त्यांची खात्री होती. प्रकल्पाच्या विहिरीला कोंबडे, बकरे न कापता पाणी लागलेले पाहून ते चकित झाले. ज्या घरात केळीचे झाड असते तेथील मुख्य माणूस मरतो, या समजुतीमुळे सबंध माडिया मुलखात कुणी केळीचे झाड लावत नव्हते. पण प्रकल्पावर केळीची बाग लावूनही कुणी मेले नाही, हे पाहून त्यांना धक्का बसला. धरती ही माता, ती नांगरणे म्हणजे तिच्या उरातच फाळ खुपसणे, असे त्यांना वाटत होते. म्हणून शतकानुशतके माडियांनी जमीन कधी नांगरली

नव्हती. आता जमीन नांगरण्याचे शास्त्र ते प्रकल्पावर पाहत आहेत, शिकत आहेत.

माडियांच्या जीवनाला अशा रीतीने नवीन आकार देण्याचे शर्थीचे प्रयत्न हेमलकसा लोकबिरादरीच्या कार्यकर्त्यांनी चालवले आहेत. त्यांच्या साहसाला सीमा नाही, त्यागाला तोड नाही आणि कष्टांना जोड नाही. काही पाश्चात्त्य तज्ज्ञ येथे आले होते. येथील काम पाहून ते थक्क झाले. म्हणाले, 'सेवेसाठी आलेल्या तरुणांचे असे साहस, असा त्याग आम्ही भारतात अनेक ठिकाणी पाहत आहोत. आम्ही जगभर फिरतो, पण अशा दुर्गम जागी, अशा खडतर वाटेवर, अशा संकटांना तोंड देत कार्य करणारे तरुण भारतात फार मोठ्या प्रमाणात आढळतात.'

## शब्दार्थ व टिपा

**आदिवासी** — प्रथमपासून दुर्गम भागात वस्ती करून राहिलेले लोक. **टांगती तलवार** — (डोक्यावर नेहमी तलवार टांगलेली असली तर माणसाला तिची भीती वाटते व तो सावधगिरीने राहतो. यावरून —) भीतीचे कारण, भीतीची जाणीव. **भेडसावणे** — भीती दाखवणे. **लोकबिरादरी** — (बिरादरी — बंधुभाव, नाते) ज्यांना लोकांबद्दल बंधुभाव वाटतो, ज्यांच्याशी आपले काही नाते वाटते असे लोक. **मोहपाश** — मायेचे बंध. **कोसरी, वरी** — धान्याचे प्रकार.. **पूरक** — पूर्ण करणारा. **पाळीचा ताप** — ठराविक काळाने येणारा ताप. **निष्ठा** — श्रद्धा, भक्ती. **कृतज्ञ** — उपकार जाणणारा. **प्रकल्प** — योजना. **अंधश्रद्धा** — बरोबर की चूक, योग्य की अयोग्य हा विचार न करता ठेवलेली श्रद्धा. **शर्थीचे** — पराकाष्ठेचे. **तोड** — बरोबरी. **दुर्गम** — जाण्यास कठीण. **साकार करणे** — प्रत्यक्षात आणणे, सत्यसृष्टीत उतरवणे. **थैमान घालणे** — गोंधळ घालणे. **लाथ मारणे** — तुच्छ समजून टाकून देणे. **पाणी सोडणे** — सोडून देणे, त्याग करणे. **पदरात पडणे** — मिळणे, प्राप्त होणे. **जिवावर बेतणे** — जीव धोक्यात येणे, जीव जाण्याचा प्रसंग येणे. **तोंड देणे** — प्रतिकार करणे, झुंजणे.

## स्वाध्याय

१. भामरागडाच्या परिसरात राहणाऱ्या लोकांना कोणकोणत्या अडचणींना तोंड द्यावे लागते?

२. हेमलकसा लोकबिरादरीने माडिया लोकांना कोणत्या नवीन गोष्टी शिकवल्या?

३. माडिया लोकांतील अंधश्रद्धांचे निर्मूलन कोणत्या प्रकारे झाले?

४. शतकानुशतके (शतक + अनु + शतके) शतकामागून शतके, अनेक शतके. खालील शब्दांपासून अशा प्रकारचे शब्द तयार करा आणि त्यांचा वाक्यात उपयोग करा.

वर्ष, युग.

५. महाराष्ट्रात कोणकोणते आदिवासी कोणकोणत्या जिल्ह्यांत राहतात ? महाराष्ट्राच्या नकाशात त्या जिल्ह्यांना रंग द्या.

६. तुमच्या परिसरातील कार्यकर्त्यास पत्र लिहा. त्यात त्याने केलेल्या कार्याचे महत्त्व लिहा.

## व्याकरण

- क्रिया पूर्ण झालेली नाही असे क्रियापदाने दर्शवले असेल, तर त्याला **अपूर्ण काळ** म्हणावा.

उदाहरणार्थ — मी जेवत आहे

रामू खेळत होता.

उद्या या वेळी मी अभ्यास करत असेन.

वरील वाक्यांत जेवणे, खेळणे, अभ्यास ह्या क्रिया पूर्ण झालेल्या नाहीत, असे क्रियापदावरून कळते, म्हणून हा **अपूर्ण काळ** होय.

क्रिया पूर्ण झालेली आहे असे क्रियापदाने दर्शवले असेल तर त्याला **पूर्ण काळ** म्हणावा.

१. मी जेवलो आहे.

२. रामू खेळला होता.

३. उद्या या वेळी मी अभ्यास केलेला असेल.

वरील वाक्यांत जेवणे, खेळणे, अभ्यास करणे ह्या क्रिया पूर्ण झालेल्यां आहेत असे क्रियापदावरून कळते, म्हणून हा **पूर्ण काळ** होय.

# १५. माझे गाणे

आमच्या वडिलांची गाण्यावर फार प्रीती असे. मला गाणे यावे ही त्यांची मनापासून इच्छा. त्यांनी माझ्या कानांवरून चांगल्या चांगल्या गवयांचे गाणे जावे, म्हणून दर महिन्यास एखादी तरी बैठक घरी करावी.

गाण्याचा शेवट होईपर्यंत झोप येऊ नये, म्हणून मी आपल्याकडून अनेक उपाय करत असे. दोन प्रहरी झोप घेई, गाणे सुरू व्हायच्या वेळी डोळ्यांत कापूर किंवा तेल घाली, पण सर्व व्यर्थ! गवई वीण्याच्या तारा व तबला लावीपर्यंत मी मोठ्या कष्टाने डोळे कसेबसे उघडे ठेवत असे. पण त्याने गाण्याकरता तोंड उघडले, की माझे उघडे डोळे मिटलेच म्हणून समजावे. माझ्याइतका शांत श्रोता कोणाही गवयास कधी मिळाला नसेल.

शेवटी मी एका सोबत्यास मला झोप आल्यास चिमटा घेण्याकरता मागे बसवू लागलो. जसा गवयाचा तबलजीवर, तसाच माझाही माझ्या साथीदारावर पहिल्यापहिल्यानेच भरवसा असे. पण पुढे पुढे असे होऊ लागले, की गवयाच्या मोहनास्त्राचा माझ्याप्रमाणे माझ्या साथीदारावरही अंमल बसून त्याच्या चिमट्याऐवजी घोरण्याने मात्र एखादे वेळी मला जाग येत असे व मलाच उलट त्याला जोराचा चिमटा घेऊन उठवावे लागे.

जागे राहण्याचे उपाय अशा रीतीने थकल्यावर, मी शेवटी झोपेस अडथळा करण्याचे अजिबात सोडून दिले. तरी माझे दैव शिकंदर असल्यामुळे माझे पेंगणे मान डोलवण्यादाखल समजले जाऊन माझ्या सुषुप्तावस्थेचा कोणालाही संशय येत नसे. कधी कधी तर चीजेतील अवसान, गवयाची दृष्टी व माझ्या मानेचा झोक यांचा विलक्षण बहारीचा त्रिवेणी संगम जमत असे व मला मार्मिकपणाबद्दलची वाहवा मिळत असे. कारण प्रत्येक गवई

माझ्या प्रासंगिक मान हालवण्याबद्दल मान तुकवत असे व अशा लहान वयात तालाचे इतके गम्य दुसऱ्या कोणत्याही मुलात सापडणार नाही अशी वडिलांपाशी तारीफ करत असे.

अशा प्रकारे निर्धास्त झाल्यावर मी भर बैठकीत यथेच्छ निद्रासुख अनुभवत असे. कधी कधी तर मोठ्याने घोरून तालाप्रमाणे सुरांचेही ज्ञान व्यक्त करत असे.

शेवटी माझ्या उसन्या मार्मिकपणाचा असा प्रतिकूल परिणाम झाला, की बाबांनी मला शिकवण्याकरता एका वस्तादजीस ठेवले. त्यांचे नाव 'टर्रेखां' होते. हे गृहस्थ गुणांनी नावाप्रमाणेच होते.

पूर्वी मला गाणे ऐकताना इतकी हटकून झोप येत असे, की मी एखादे वेळी आजारी पडून मला झोप येईनाशी झाली व वैद्यांचे औषधोपचार थकले म्हणजे बाबांनी गाणे करावे, की गवयाच्या एका चीजेसरशी मला



डाराडूर झोप लागत असे. पण तो मनू आता बदलला. टेंखांच्या आवाजात इतके 'मार्दव' असे, की त्यांचे गाणे चालले असताना पुष्कळदा गाढवे भोवताली जमून ते एकचित्ताने ऐकत असत व कधी कधी त्यांच्या सुरास सूरही देत असत. अर्थात अशा आवाजाने माझी झोप कायमची नाहीशी केली.

बरे, आवाजात काही लवचिकपणा होता म्हणावे तर तेही नाही. मानेला सपाटून हिसका द्यावा, तेव्हा कोठे लहानसा खटका येत असे. सर्व अंग जेव्हा घुसळावे, तेव्हा तान यावी व तीही इतकी सावकाश, की ही तान की हे नुसते सूर हे कळण्याची मारामारच. पुष्कळदा तर ते तान हातांनी दाखवत असत व सूर उंच चढवण्याऐवजी आपले सर्व शरीर उंचावत असत.

अशा तऱ्हेची त्यांची स्वतःची तयारी असल्यामुळे, मला शिकवतानाही ते आंतर व नैसर्गिक गुणांपेक्षा बाह्य व कृत्रिम उपायांवरच भिस्त ठेवत असत.



गाण्यातील मूर्च्छना म्हणून जो प्रकार आहे तो मला चांगला साधावा म्हणून ते मला खरोखरच मूर्च्छना येईपर्यंत यथेच्छ मार देऊन रडवत असत. खट्का यावा म्हणून माझी शेंडी धरून जोराने हिसका देत, तान चांगली यावी म्हणून हिवाळ्यात सकाळी पाठीवर थंड पाण्याच्या घागरी ओतत असत. अशा उपायांनी मला शेवटी हिवतापाचे दुखणे लागले.

हिवाची पाळी बहुतकरून टर्रेखां माझ्या समाचारास येत त्या वेळची असे. कधीकधी त्यांची येण्याची वेळ बदले, तेव्हा हिवाची माझी पाळीही बदलत असे. अखेरीस माझा आजार व वस्तादजींचे आगमन यांमधील या प्रकारचा कार्यकारणभाव ताडून व वस्तादजींचे न येणे हेच माझ्या रोगावर वस्ताद औषध होईल, हे जाणून बाबांनी त्यांचे येणे बंद केले. तेव्हापासून माझ्या प्रकृतीस उतार पडत चालला. मात्र यापुढे काही दिवस कोणत्याही प्रकारचे गाणे माझ्या ऐकण्यात येऊ नये अशी व्यवस्था करण्यास वैद्याने बाबांस बजावले होते. इतकेच नाही, तर तंबोऱ्यांची आठवण होईल, म्हणून भोपळ्याची भाजीही मी बरेच दिवस वर्ज्य केली होती.

ज्याला चांगला गवई म्हणून घ्यायचे असेल त्याने खालील नियम अवश्य ध्यानात ठेवावे. त्यापासून त्याचे हित होईल.

डोक्यास जरीची टोपी घालून अंगावर शालजोडी घेत जावी. या वस्तूंमुळे श्रोत्यांवर पडणारे तेज दुणावते.

ज्या बैठकीस आपले गाणे व्हायचे ठरले तिला नेहमी उशिराने जावे. अशा प्रकारे लोकांना त्रास दिल्यावाचून स्वतःचे महत्त्व वाढत नाही.

गाण्यापूर्वी दोन तास वीण्याच्या किंवा सतारीच्या तारा जुळवण्यात किंवा तबला लावण्यात दवडावे. कारण तारा चढवताना आपण श्रोत्यांची उत्कंठाही त्याच मानाने चढवत असतो हे पक्के समजावे. कधी कधी तर ती अगदी तुटण्याच्या बेतास येते. गवई तंबोऱ्याच्या खुंट्या पिळत असता किंवा तबल्यावर थाप देत असता कितीकदा तरी त्याचे कान पिरगळण्याची किंवा गालावर थप्पड देण्याची इच्छा श्रोत्यांच्या मनात झालेली दिसून येते!

तबलजीस चुकवण्याचा प्रयत्न करावा किंवा तो चुकत नसल्यास त्याच्याकडे विनाकारणं धिक्काराने पाहावे. आपल्या साथीदारांचा असा पाणउतारा करत गेल्यास, आपले गाणे कोणाच्या पसंतीस न उतरले,तरी त्याचे खापर त्याच्या टाळक्यावर फोडता येते.

वरील सर्व नियमांपेक्षा महत्त्वाचा नियम अजून सांगायचा राहिला आहे. तो हाच, की गाताना तोंड जितके वेडेविंद्रे व भेसूर करवेल तितके करावे. याचे कारण इतकेच, की जो जो तुमचा चेहरा विद्रूप दिसत जाईल तो तो त्याच्याशी तुलना करता तुमच्या गाण्याची खुमारी अधिक स्पष्ट कळून येणार आहे. अंधारात दिव्याचे तेज विशेष पडते किंवा सहारा वाळवंटात रम्य उद्यान आढळून आल्यास ते फारच बहारीचे वाटते. त्याप्रमाणे कुरूप तोंडातून मनोहर गाणे ऐकू आल्यास त्याची मातब्बरी अधिक वाटते.

## शब्दार्थ व टिपा

**मोहनास्त्र** — गुंगी आणणारे साधन. **शिकंदर** — जोरदार. **सुषुप्तावस्था** — गाढ झोप. **चीज** — गाण्यासाठी पद, ओळी. **अवसान** — (गाताना) थांबण्याची जागा. **गम्य** — समज असणे. **निर्धास्त** — काळजी नसलेला. **वस्तादजी** — गुरू. **मनू** — काळ. **वस्ताद** — रामबाण. **उत्कंठा** — उत्सुकता. **धिक्काराने** — तुच्छतेने. **पाणउतारा** — अपमान. **विद्रूप** — कळाहीन. **खुमारी** — गोडी. **मातब्बरी** — महत्त्व. **बैठक करणे** — गाण्याचा कार्यक्रम आयोजणे.

## स्वाध्याय

१ लेखकाला संगीताचे मार्मिक ज्ञान आहे, असा गवयाचा समज का झाला?
२. टेंरखांच्या गायनशैलीची वैशिष्ट्ये कोणती?
३. लेखकाला हिवाच्या पाळीचा ताप का येऊ लागला व तो येणे कसे बंद झाले?
४. लेखकाने पाठात सांगितल्याप्रमाणे चांगल्या गवयाची लक्षणे कोणती?
५. ह्या पाठातील दोन विनोदस्थळे सांगून तेथे विनोद कसा निर्माण झाला ते लिहा.
६. भारतीय संगीत व काही नव्या-जुन्या सुप्रसिद्ध गायकांची माहिती मिळवून ती लिहा.

# १६. फेकला तटाहुन घोडा

लक्ष्मीचा धैर्यतट अढळ जरि झाशीचा तट ढळला
तन्निश्चय बुरुज न हाले एकेक बुरुज जरि पडला
परि वेढ्याच्या पाशांनी जखडाया वैरी सजला
काळकंठ जे चिरतील
जीवास जीव देतील
घेऊन असे रणशील
फोडाया दुर्गम वेढा फेकला तटाहुन घोडा

मर्दानी बांधुन फेटा चिलखत चढवी अंगात
जहरी जंबिया कमरेला नंगी समशेर करांत
पाठीस बांधिला पुत्र कुरवाळुनि वात्सल्यात
'अस्मानफेक'जातीच्या
वेगी चढल्या छातीच्या
तुरंगी चढली त्वेषाच्या
सरकावुन मागे थोडा फेकला तटाहुन घोडा

नभ विदारुनी तेजस्वी ही वीज उडाली काय?
भीमाच्या हातामधली कोसळे गदा की काय?
निखळुनी स्वर्गद्वाराची अर्गलाच पडली काय?
क्षण भास असा तैं झाला
प्रत्येक पहारेवाला
विस्मित होउनी ठेला
दाखवीत गगनक्रीडा फेकला तटाहुन घोडा

देह जरी चाले पुढती प्राण तरी होता पृष्ठी
चौखूर उधळता घोडा तोलून धरी सुत-यष्टी
तो कण्हून 'आई' वदता अंतरात होई कष्टी

सोडिला तिने दौलतिचा
वाडा तो समृद्धीचा
परि एकच तो जीवाचा

पाठीला घेउनि वाडा फेकला तटाहुन घोडा

सारीत तमःपट आली ती उषा पूर्व-दिक्क्षितिजी
स्वातंत्र्य-गोल सूर्याचा सरसरला व्योमामाजी
आवरी जरा लक्ष्मी ती झाशिच्या सिमेवर वाजी

सोडिला बाळ पाठीचा
घास त्या दिला प्रेमाचा
दिसला घोडा बौकरचा

ही तेव्हाची रिपु-पीडा फेकला तटाहुन घोडा



राष्ट्राच्या कल्याणार्थ कल्याणिनि करी कल्लोळ
ती प्रिय भारत-भाग्यार्थ भागिरथी झाली लोल
आर्यांचे बघुनी हाल हालवी मही-दिग्गोल

मर्दानी झाशीवाली
परवशता पायांखाली
चिरडून निघे जयशाली

स्वातंत्र्याचा मनि ओढा फेकला तटाहुन घोडा

## शब्दार्थ व टिपा

**तट** — किल्ल्याभोवतीचा कोट. **जहरी** — विषारी. **अर्गला** — अडसर. **ठेला** — राहिला. **यष्टी** — काठी. **व्योम** — आकाश. **रिपू** — शत्रू. **लोल** — अस्वस्थ. **मही** — पृथ्वी. **दिग्गोल** — विश्व.

## स्वाध्याय

१. झाशीच्या राणीने कोणता पेहराव चढवला होता?
२. पहारेवाला आश्चर्यचकित का झाला?
३. 'लक्ष्मीचा प्राण' पाठीवर होता ही कल्पना स्पष्ट करा.
४. झाशीच्या राणीचे धाडस तुमच्या शब्दांत लिहा.
५. 'फेकला तटाहुन घोडा' हे शीर्षक कवितेला का दिले आहे?
६. खालील ओळींचा अर्थ स्पष्ट करा.
   (१) लक्ष्मीचा धैर्यतट अढळ, जरी झाशीचा तट ढळला.
   (२) ती प्रिय भारत-भाग्यार्थ, भागिरथी झाली लोल.
७. प्रत्येकी दोन समानार्थी शब्द सुचवा.
   मुलगा, वैरी, नभ.
८. उलट अर्थाचे शब्द लिहा.
   दुर्गम, दुष्ट.
९. झाशीच्या राणीची माहिती मिळवा.
१०. १८५७ च्या स्वातंत्र्य-समरातील नेत्यांची छायाचित्रे जमवा.

# १७. आमची राणी

'विश्रामधाम' संस्थानच्या राणीसाहेबांचा वाढदिवस दरवर्षी थाटात साजरा होत असे. राणीसाहेब शिक्षणप्रिय असल्यामुळे शाळेतल्या मुलांसाठी एक खास चढाओढ ठेवण्यात आली होती. 'आमची राणी' या विषयावर शाळेतल्या विद्यार्थ्यांकडून निबंध मागवण्यात आले होते. त्यांना पुरस्कारही ठेवण्यात आलेले होते.

पुरस्कारासाठी आलेल्या निबंधांवरून नजर फिरवत,संध्याकाळच्या प्रहरी येवलेगुरुजी भिंतीला टेकून बसले होते. एक निबंध त्यांनी हाती घेतला. तो 'येशा' नावाच्या विणकराच्या मुलाने लिहिलेला होता. ते निबंध वाचू लागले, पण तो निबंध नव्हता. ती एक कथा होती, गावच्या बनीची —



बनी आमच्या गल्लीत केव्हापासून राहायला आली व आम्ही तिला राणी केव्हा म्हणायला लागलो हे आता आठवत नाही. पण पहिल्यापासूनच आम्हा मुलांनाच नव्हे, तर गल्लीतल्या सर्व मंडळींना तिचा दरारा वाटायला लागला हे मात्र खरे. सकाळच्या प्रहरी गल्लीतून फेरफटका करायला ती बाहेर पडे. ह्या वेळी शेडबाळेच्या दुकानात शिरून, ती कित्येक दिवस अंथरुणाला खिळून राहिलेल्या त्याच्या बायकोची चौकशी करी. आमच्या घरासमोर आई तणाव्यावर सूत लावून कापड काढण्याच्या तयारीत असे. तिची व बाबांची चौकशी करी. कुठे गिरजाबाईच्या घरी चहा घेई, तर कुणाला तांदूळ निवडायला मदत करी. संध्याकाळच्या प्रहरी ती कधी आम्हांला फिरायला घेऊन जाई, तर कधी वडाच्या पारावर बसून गोष्टी सांगे. गल्लीतल्या मुलांना एकत्र जमवून गोट्या, विटीदांडू, सूरकाठी असे खेळ खेळण्यातही ती कित्येकदा भाग घेई. आम्हां मुलांवर तिचे प्रेम होते. कधीकधी चकचकणारे रुपयाचे नाणे काढून ती आमच्या हातावर ठेवी व म्हणे, 'जा, खायला घ्या काहीतरी.' एकदा शामाचे अभ्यासाचे पुस्तक हरवले व पुस्तकाशिवाय तर गुरुजी त्याला वर्गात बसू देईनात. पुस्तक गेल्याचे घरी सांगितले तर मार बसेल हे त्याला ठाऊक होते. न सांगावे तर पुस्तक कुठून मिळणार व वर्गात कसे जाणार? अशा पेचात सापडल्यामुळे काय करावे हे त्याला सुचेना. अखेर तो कोपऱ्यावरच्या पाराच्या कट्ट्यावर जाऊन बसला. त्याचे रडणे ऐकून बनी तिथे आली व त्याला घेऊन तिने लागलीच बाजारातून पुस्तक आणून दिले. आम्ही तिला 'राणी' म्हणत होतो ते उगीच नाही!

पण मला राणी आवडे ती काही तिच्याकडून वेळोवेळी खाऊ मिळे, गोष्टी ऐकायला मिळत किंवा तिच्याबरोबर फिरायला जायला मिळे म्हणून नव्हे, तर तिच्यासारखी उत्तराला प्रत्युत्तर देणारी, कुणालाही न भिणारी मुलगी मी कधी पाहिली नव्हती म्हणून. तिचे लग्न होऊन तीन-चार वर्षे झाली होती म्हणे, पण नवऱ्याच्या व्यसनीपणाला कंटाळून घर सोडून ती बाहेर पडली होती. आईबापावर आपला भार घालायची तिची इच्छा नव्हती, म्हणून

आईबापांच्या घरचा हक्काचा आश्रयदेखील तिने घेतला नव्हता. ती कुठे राहत असे हे कुणालाच नीटसे माहीत नव्हते. मात्र दररोज सकाळच्या प्रहरी गल्लीतल्या बायका स्वयंपाकपाणी, केरवारा करण्यात गुंतलेल्या असत, त्यावेळी स्वच्छ धुतलेले पातळ चापूनचोपून नेसून, तोंडाने शीळ घालत चाललेली उंचनिंच राणी सर्वांच्या दृष्टीस पडे.

एकदा काय झाले, आमच्या आईला बरे नव्हते. पण विणकऱ्याला अन् त्यातून घरच्या बाईला विसावा कुठला? एक-दोन दिवस तिने तसेच काम रेटले. अखेर व्हायचे तेच झाले. एक दिवस फणफणून ताप आला आणि तिने अंथरूण धरले. आदल्या दिवशी बाबा कुठेतरी कुस्त्या पाहायला गेले होते; ते जेवणाच्या वेळेला आले आणि पाहतात तो आई घोंगड्यावर पडलेली! बाबा आधीच तापट, त्यातून वेळ होऊन गेली तरी जेवण तयार नाही हे पाहून त्यांचे माथे भडकले. त्यांनी रागाने विचारले, "का झोपलीस अशी?"

"बरं नाही."

"अन् मग जेवण कोण करणार तुझा बा?"

"भागाबाई पाठवणार आहे तुमच्यापुरतं."

"जेवणाचं राहिलं. पर त्या उत्तमचंद शेठजींचा सणंग काढलाय काय?"

"नाही." आईने बारीक आवाजात उत्तर दिले.

बाबांनी ओरडून म्हटले, "तुला बजावून गेलो नव्हतो, कालच्या दिवसात ते पुरं व्हायला हवं म्हणून?"

"पण कालपासून अगदी बरं नाही मला."

"बरं नाही म्हणे! आणि आता शेठजीकडून माणूस आला म्हणजे त्याला काय देऊ? तुझं फाटकं धडुतं? दोन वायदे चुकले त्यांचे. आता पुन्हा मिळेल काय त्यांच्याकडचं काम?" असे म्हणून जमिनीवर पडलेला धान्याचा रिकामा डबा त्यांनी खाड्कन पायाने ठोकरला.

इतक्यात राणी आत आली. मोठ्याने बाबांना म्हणाली, "काय हो, वेडाचा झटका आला की काय तुम्हांला? आजारी बाईला त्रास देता? काय लाज नाही वाटत. बिचारीचं अंग कसं तापल्या तव्यावानी झालंय पाहा तर."

"ते काय ठाऊक नाही मला. आज सणंग तयार झाला पाहिजे, नाहीतर तिला उठवून काम करायला लावीन."

"वा रे वीर गडी! अन् तुम्हांला काय हात नाहीत,की अंगात शक्ती नाही तुमच्या?"

राणी आणखी काही बोलणार होती, पण तेवढ्यात आईने तिच्या तोंडावर हात ठेवला आणि म्हटले, "राहू दे बया, उगीच का तोंडाला लागतीस त्यांच्या?"

"हांऽ! आवर तुझ्या मैतरणीला. शहाणपणा शिकवतीय मला," बाबा म्हणाले.

आता मात्र राणीला राहवेना. ती चवताळून उठली आणि ओरडली, "आता चालते होता की नाही इथून? जा, उठा.'

अन् केवढे आश्चर्य! आईला लाथ मारायला उठणारे बाबा शेळीसारखे निमूटपणाने बाहेर निघून गेले.

आईला विनाकारण त्रास दिल्याबद्दल मला बाबांचा राग आला होता. त्यामुळे त्यांना गप्प बसवणाऱ्या राणीचे मला फार कौतुक वाटले. धावत जाऊन मी तिच्या पायांना विळखा घातला आणि म्हटले, "किती चांगली आहेस ग तू राणी!"

त्या दिवशी सूर्य मावळायच्या आत शेजारच्या भागाबाईच्या मदतीने राणीने शेठजींचा सणंग विणून तयार ठेवला.

एकदा शाळा सुटल्यावर राणीने आम्हांला फिरायला घेऊन जायचे असे ठरले होते. शाळेतून लवकर निसटण्यासाठी आम्ही घाईघाईने पर्वचा म्हणत होतो. त्या घाईगर्दीत 'पाचा पाचा सत्तावीस', 'आठ नवे बासष्ट' असे अंकगणिताचे काय काय नवीन शोध आम्ही लावले याचे आम्हांला भान

नव्हते, पण गुरुजींचे तिकडे बारीक लक्ष होते. पर्वचा संपवून आम्ही निघालो तेव्हा सर्वांना थांबवून गुरुजी म्हणाले, "थांबा, जाऊ नका! पर्वचा फार कच्चा राहिला आहे तुमचा. पुन्हा एकदा म्हणा नीट. बरोबर आल्याशिवाय जायचं नाही कुणी. पाहू कसा चुकतो ते."

तिकडे पारावर आमची वाट पाहत उभ्या राहिलेल्या राणीचे चित्र मला दिसू लागले. मी धीटपणाने म्हणालो, "गुरुजी, उद्या म्हणू आम्ही बरोबर."

"उद्या नाही, आत्ताच!" गुरुजी म्हणाले.

"आज नको गुरुजी. जायचं आहे आम्हांला," शाम म्हणाला.

"कुठं?"

"फिरायला. राणीबरोबर."

"राणीबरोबर? ही कोण बुवा राणी?"

आम्हांला वाटले राणीचे नाव ऐकल्याबरोबर गुरुजी आम्हांला सोडतील. म्हणून मी उत्साहाने सांगू लागलो, "ती पांढरं पातळ नेसून आपल्या गल्लीतून फिरते ना गुरुजी..."

माझे बोलणे संपायच्या आत गुरुजी म्हणाले, "ती राणी काय तुमची?



वाटेल तिथं भटकणारी ती. तिला राणी म्हणता तुम्ही? खबरदार पुन्हा तिला कुणी राणी म्हणेल तर! हं, म्हणा आता पर्वचा.''

अंगावर वीज पडल्यासारखे आम्ही स्तब्ध उभे राहिलो. आमचे घसे सुकले होते व तोंडातून शब्द येत नव्हता. रडव्या स्वराने आम्ही एकीकडे पर्वचा म्हणत होतो, पण आमचे सारे लक्ष पारावर होते. गुरुजींनी आम्हांला सोडले तेव्हा अंधार झाला होता. गुरे चरून परत निघाली होती. वडाच्या पारंब्या वाऱ्याने हालत होत्या. पाराच्या कट्ट्यावर बसून राणी आमचीच वाट पाहत होती. आम्ही धावतच तिच्याकडे गेलो, सारी हकीकत सांगून मुसमुसून रडलो.

''तुला काहीतरीच नावं ठेवतात बघ गुरुजी. तशी नाहीस ना ग तू राणी?'' मी रडव्या स्वराने विचारले.

राणीने माझा चेहरा कुरवाळला आणि दूरवर पाहत हसून म्हटले, ''तुमच्या गुरुजींना पर्वचा येत असेल, पण दुसरं काय समजतंय त्यांना? भाबडे आहेत ते.''

आम्ही खुदकन् हसलो.

त्यानंतर आम्ही पाचसात दिवस शाळेत गेलो नाही.

अन् मग एके दिवशी एकाएकी राणी कुठे नाहीशी झाली! सकाळी ती रोजच्यासारखी गल्लीत दिसली नाही, तेव्हाच मला चुकल्यासारखे झाले. कदाचित ती संध्याकाळी येईल असा विचार करत मी शाळेत गेलो. पण संध्याकाळीही ती कुठे नजरेस पडली नाही. दुसरा दिवस उजाडला आणि मावळला. असेच सातआठ दिवस गेले, पण राणी दृष्टीस पडली नाही. रोज संध्याकाळी पारावर बसून मी राणीची वाट पाहतो व अंधार झाला की खाली मान घालून परत येतो.

राणी, कुठं गेलीस ग तू?   गुरुजींवर रागावलीस होय? पण म्हणून आम्हांला का टाकून गेलीस? आमचा कंटाळा का आला तुला? ये, परत येना.

— येशाचा निबंध वाचून झाला तरी येवलेगुरुजी त्या कागदांकडे पाहतच राहिले. त्या दिवशीचा पर्वचाचा प्रसंग त्यांना आठवला. येशाचे पाण्याने भरलेले डोळे व रडवी मुद्रा त्यांना दिसू लागली व बनीची उंच, ताठ मूर्ती त्यांच्या दृष्टीसमोर उभी राहिली.

त्यांचे डोळे अश्रूंनी भरून आले.

**शब्दार्थ व टिपा**

**सणंग** — विणलेले वस्त्र, वस्त्राचा तागा. **पर्वचा** — पाढे. **माथा भडकणे** — खूप राग येणे.

**स्वाध्याय**

१. शाळेतल्या मुलांना राणी का आवडायची?

२. लेखकाला राणीचे कौतुक का वाटले?

३. मुलांचे पर्वचा म्हणण्यात लक्ष का नव्हते?

४. येवलेगुरुजींच्या डोळ्यांत अश्रू का उभे राहिले?

५. स्वयंपाकपाणी, केरकचरा यांसारखे तीन शब्द लिहा.

**व्याकरण**

- क्रियेविषयी विशेष माहिती सांगणाऱ्या शब्दाला **क्रियाविशेषण** म्हणतात.

  उदा. तो **जोरात** धावतो.

  मी **खदखदून** हसलो.

  आम्ही **भरभर** जेवलो.

  वरील वाक्यांत जोरात, खदखदून, भरभर हे शब्द अनुक्रमे धावण्याच्या, हसण्याच्या व जेवण्याच्या क्रियांबद्दल विशेष माहिती सांगतात, म्हणून त्यांना **क्रियाविशेषण** म्हणतात.

- खालील उदाहरणांतील क्रियाविशेषणे ओळखा.

  (१) बनी स्वच्छ धुतलेले पातळ चापूनचोपून नेसायची.

  (२) त्यांनी रागाने विचारले.

  (३) बनी चवताळून उठली.

  (४) बाबा निमूटपणाने बाहेर निघून गेले.



# १८. अरण्य-प्रकाश

## निवेदन

हे वर्तमानपत्र मकरसंक्रांतीच्या मुहूर्तावर आमच्या वाचकांच्या हाती देताना आम्हांला फार आनंद होत आहे. आज आमच्यावर माणसांनी नानातऱ्हेचा जुलूम चालवला आहे. कोणी खाण्याकरता आमची शिकार करतात, कोणी कातड्याकरता आम्हांला गोळ्या घालतात, तर कोणी प्राणिसंग्रहालयात ठेवण्याकरता आम्हांला पकडून नेऊन आमचे स्वातंत्र्य हिरावून घेतात. रस्ते करण्याकरता कितीतरी जंगल माणसांनी तोडले. त्यामुळे आमची घरेदारे नष्ट झाली आहेत. ठिकठिकाणीं जाळी व सापळे लावून आणि गोफणींनी दगडफेक करून आमची हत्या केली जात आहे. हा सर्व संहार थांबावा आणि आमचे रक्षण व्हावे याकरता चळवळ सुरू आहे. 'अरण्य-प्रकाश' हे



वर्तमानपत्र याचकरता आहे. शहराच्या लोकांना (विशेषतः बालकांना) आमच्या चळवळी, आमचे आचारविचार, हालचाली, सर्व काही कळावे असा या वर्तमानपत्राचा उद्‌देश आहे.

## राजा मृगेंद्रप्रसादसिंग यांचे आगमन

खंडाळा जंगल (आमच्या बातमीदाराकडून) : उत्तर हिंदुस्थानातील प्रख्यात राजा मृगेंद्रप्रसादसिंग हे नाताळात येथे आले होते. त्यांचे दोघे चिरंजीव व इतर लवाजमा त्यांच्याबरोबर होता. प्रथम या लवाजम्याच्या सिंहनादांनी आणि मृगेंद्रप्रसाद यांची भयंकर आकृती पाहून सर्व पशुपक्षी घाबरून गेले. परंतु लवकरच ही मृगेंद्रप्रसादांची स्वारी आहे, असे कळल्याने सर्वांना आनंद झाला. सर वनराज, रा. ब. वाघ, श्री. गरुड, श्रीमती कोकिळाबाई, श्री. राजहंस, रा. ब. अस्वले, श्री. पिंगळे इत्यादी येथील पुढारी मंडळींनी राजा मृगेंद्रप्रसाद यांचे स्वागत केले. सुमारे पाच हजार पशुपक्षी जमले होते. नंतर मृगेंद्रप्रसाद सर वनराज यांच्या गुहेत मुक्कामास गेले.





## जंगी जाहीर सभा

खंडाळा (आमच्या बातमीदाराकडून) : पठारावर पशुपक्ष्यांची जंगी जाहीर सभा भरली होती. सर वनराज अध्यक्षस्थानी होते. कवी मच्छर यांनी मृगेंद्रप्रसादांच्या स्तुतिपर लिहिलेली पदे गाऊन दाखवली. सर वनराज यांनी मृगेंद्रप्रसादांचे स्वागत केल्यावर राजेसाहेब म्हणाले, 'पशुपक्षी मित्रहो, आपण आपली भांडणे विसरून आपली काळजी घेण्यास शिकले पाहिजे. मागील वर्षी बिहारमध्ये भूकंप झाला, त्या वेळी माणसांनी पाहा आपले मतभेद टाकून देऊन किती पैसे जमवले. पण जंगलातल्या पशूंनी अशी एकी केली काय? जंगलात वणवे लागतात. त्यांत जळून गेलेल्या पशुपक्ष्यांच्या कुटुंबांची आपण काय काळजी घेतो? ही वृत्ती आपण टाकून दिली पाहिजे. सर्व हुशार मानवजात आपल्या विरुद्ध उठली आहे. याकरता आपण एक झाले पाहिजे.'



नंतर कर्नल टॉम, कु. मनुताई मांजरेकर, श्रीमती गायत्री इत्यादींची भाषणे झाल्यावर मृगेंद्रप्रसादांच्या जयजयकारात सभा समाप्त झाली. मृगेंद्रप्रसाद माणसांवर टीका करू लागले, तेव्हा काही माकडांनी व वानरांनी थोडी गडबड केली. पण 'माणसांच्या या पूर्वजांना' लागलीच हाकून देण्यात आल्यामुळे शांतता झाली.

(पुढील अंकी मृगेंद्रप्रसाद यांची 'अरण्य-प्रकाशा'स खास मुलाखत)

## पारतंत्र्यातून मुक्तता

किनवट (तारेने) : जंगी सर्कसमधील एक वाघ आपल्या पारतंत्र्यास, माणसाच्या जुलमास आणि उपासमारीस कंटाळून पळून येथे आला. त्याला शुद्ध करून परत कळपात घेण्यात आले. ही गोष्ट स्तुत्य आहे. सर्व पशुपक्ष्यांनी असे केले पाहिजे. नाहीतर एकदा माणसात गेलेल्या बंधूवर आपण कायमचा बहिष्कार घालतो, तो योग्य नव्हे.

## बगळेशास्त्री यांचे पुराण

तळेगाव (खास बातमीदाराकडून) : येथील एका तळ्यावर बगळेशास्त्री आले असून ते फार उत्तम पुराण सांगतात, असा लौकिक पसरला आहे. सध्या त्यांचा मुक्काम बदकराव पाणबुडे यांच्याकडे आहे. बगळेशास्त्री यांचा बराच काळ स्नानसंध्या व ध्यानधारणा यांत जातो, पण तळ्यातील मत्स्य नावाचे रहिवासी मात्र घाबरले असून बगळेशास्त्री दिसतात तसे नाहीत, असे सर्वजण म्हणतात. खरा प्रकार काय आहे देव जाणे.

## अभिनंदनीय विवाह

सुंदरबन (एका बातमीदाराकडून) : सुंदरबन पक्ष्यारण्य येथील तरुण पुढारी मोरेश्वर पिसारे यांचा विवाह कु. लांडोर यांच्याबरोबर मोठ्या थाटाने झाला. समारंभास मावळातील बहुतेक प्रमुख पशुपक्षी हजर होते.

| 'रामबाण' | पाहिजे |
|---|---|
| हे औषध वैद्यभूषण कपीश्वर हनुमंते यांनी तयार केले आहे. जखम बरी करण्यास फार गुणकारी. एका द्रोणाची किंमत दोन मुठी कंदमुळे.<br><br>पत्ता :<br>वै. भू. कपीश्वर हनुमंते<br>पिंपळगाव, जिल्हा काजुपूर. | श्रीमती कोकिळाबाई मधुरकंठे यांच्या मुलाचे संगोपन करण्यास दाई पाहिजे. कोकिळेसारख्या दिसणाऱ्या पक्षिणींनीच अर्ज करावेत. कावळ्यांचे अर्ज आधी विचारात घेतले जातील.<br><br>पत्ता :<br>श्रीमती कोकिळाबाई मधुरकंठे,<br>कल्पतरू सदन, परसबाग. |

## एक रत्न हरपले

दंडकारण्य जिल्ह्यातील लोकप्रिय पुढारी सुलोचन हरणे हे परवा जंगलात हिंडत असताना कोणी पारध्याने गोळी घालून त्यांना ठार केले. हा

प्रकार ऐकून सर्व पशुपक्ष्यांस दुःख होईल. सुलोचन यांचा स्वभाव साधा आणि निगर्वी होता. ते कोवळ्या पाल्याखेरीज काही खात नसत. त्यांचे आचरण पाहून सर्व पशुपक्षी त्यांचा आदर करत. असा गोड स्वभावाचा पुढारी नाहीसा झाल्याने मोठीच हानी झाली आहे. ईश्वर मृतात्म्यास शांती देवो.

## मोठी चोरी

मधुबन येथील पशुपक्ष्यांमध्ये मोठी खळबळ उडाली आहे. येथील प्रसिद्ध व्यापारी उंटोजी वाकडमानवाला यांनी पुष्कळ मांस व फळे आणून आपल्या येथे ठेवली होती. परंतु ते आपल्या कुटुंबासह एके ठिकाणी मेजवानीस गेले असता चित्तो बिबळे व तरसो लांडगे नावाच्या दोघां दरोडेखोरांनी ते पळवले. बिबळे व लांडगे यांना पकडण्यात आले; परंतु पुरेसा पुरावा न मिळाल्याने न्यायमूर्ती रा.सा. कोल्हे यांनी त्यांना सोडून दिले. आता वाकडमानवाला हे न्यायमूर्ती सर राजेंद्र यांच्या हायकोर्टात अपील करणार आहेत.





## अचूक भविष्य

हिमालयातील प्रसिद्ध ज्योतिषी हंसस्वामी हे मानससरोवराकडे जात असता सागर सरोवर येथे मुद्दाम उतरले आहेत. नुसते तोंड पाहून किंवा पंजा पाहून भविष्य सांगण्यात स्वामी तरबेज आहेत. आजवर शेकडो पशुपक्ष्यांनी आपली भविष्ये त्यांच्याकडून वर्तवून घेतली आहेत. तरी याचा फायदा येथील व आसपासच्या पशुपक्ष्यांनी जरूर घ्यावा. हंसस्वामींचा मुक्काम खालील ठिकाणी आहे.

पत्ता : सर कासवजी तळेकर यांचा बंगला, सागर सरोवर, अरण्येश्वर.

### शब्दार्थ व टिपा

**संहार** — नाश. **वणवा** — अरण्यात लागलेली आग. **लौकिक** — ह्या जगातील प्रसिद्धी. **रामबाण** — अचूक. **पारधी** — शिकारी. **आचरण** — वागणूक. **तरबेज** — हुशार. **रा. सा.** — रावसाहेब.

## स्वाध्याय

१. माणसांनी पशुपक्ष्यांवर कोणता जुलूम चालवला आहे?

२. अरण्य-प्रकाश वर्तमानपत्राचा कोणता उद्देश आहे?

३. मृगेंद्रप्रसादांनी कोणता उपदेश केला?

४. मधुबन येथील पशुपक्ष्यांत खळबळ का उडाली?

५. एका वाक्यात उत्तरे लिहा.

(१) मृगेंद्रप्रसाद यांच्या सभेत कोणी गडबड केली?

(२) सर्कसमधील वाघ पळून का आला?

(३) बगळेशास्त्रींचा लौकिक कोणता आहे?

(४) हंसस्वामी कोणत्या गोष्टींत तरबेज आहेत?

६. खालील शब्द वाचताच तुमच्या दृष्टीसमोर कोणते पशुपक्षी येतात?

मृगेंद्रप्रसाद, कर्नल टॉम, मांजरेकर, गायत्री, मोरेश्वर, कपीश्वर, वाकडमानवाला.

७. कारण काय असावे?

(१) कोकिळाबाईंनी कावळ्यांच्या अर्जास अग्रक्रम दिला.

(२) वैद्यभूषणांनी औषधांची किंमत कंदमुळांच्या स्वरूपात मागितली.

(३) बगळेशास्त्री येताच मासे घाबरले.

८. तीन दैनिकांची, दोन साप्ताहिकांची,एका पाक्षिकाचे व एका मासिकाचे नाव लिहा.

९. खालीलपैकी एका प्रसंगासाठी बातमी तयार करा.

(१) तुमच्या शाळेतील विद्यार्थी स्कॉलरशिप परीक्षेत जिल्ह्यात प्रथम आला.

(२) शाळेने विविध वस्तुभांडार सुरू केले.

(३) महात्मा गांधी जयंतीनिमित्त वक्तृत्व स्पर्धा घेण्याचे ठरले.

(४) तुमच्या घरातील गाय रात्री दावे तोडून पळून गेली.

१०. वर्तमानपत्रात येणारी बातमीपत्रे, जाहिराती, निवेदने वाचा. त्यांतील विविधता, आकर्षकता व चपखल शीर्षके समजून घ्या.

# १९. हे दणकट माझे बाहू

हे दणकट माझे बाहू, हे मजबुत दोन्ही पाय
असता ही निधडी छाती, सांगा या धरतीवरती
उणे मला हो काय ? ।। धृ. ।।

'अशक्य' हा मज शब्द न माहित, 'प्रयत्न' माझा देव
ह्या देवाचे पूजन करिता नित्य येतसे चेव
कर्मावर ज्याची भक्ती, तो अजिंक्य हो या जगती
हा दुनियेचा न्याय ।। १ ।।

व्यर्थ न मी ही शिणविन काया, कष्टांनाही अर्थ हवा
भले,बुरे मी सदा ओळखिन, त्यागही माझा सार्थ हवा
अंधासम श्रद्धा नुसती, नच डोळस जे अनुसरती
मागे जनसमुदाय ।। २ ।।



निर्धाराचा मी पुतळा मज जिंकायाला विश्व उणे
स्वाभिमान ह्या नसानसांतिल घडविल माझे हेच जिणे
हे सदैव पाउल पुढती, यशकमान माझी चढती
झेंडा फडकत जाय ।। ३ ।।



## शब्दार्थ व टिपा

**निधडी छाती** — धाडसी वृत्ती. **चेव** — आवेश.

## स्वाध्याय

१. मला या जगात काही कमी नाही, असे कवी का म्हणतो?

२. कर्तव्यकर्म करत राहणाऱ्यांबाबत कवी काय म्हणतो?

३. आपल्याला नेहमी अधिकाधिक यश मिळेल, असा कवीला आत्मविश्वास का वाटतो?

४. कोणते लोक जगात स्वतःची प्रगती करू शकतात?

५. पुढील वचनांचा अर्थ स्पष्ट करा.

(अ) प्रयत्ने वाळूचे कण रगडिता तेलही गळे.

(आ) प्रयत्नांती परमेश्वर.

(इ) केल्याने होत आहे रे,आधी केलेचि पाहिजे.

६. प्रत्येकी दोन समानार्थी शब्द लिहा.

काया, धरती.

७. कोणतीही दोन समरगीते मिळवा व ती सामूहिकपणे म्हणा.

# २०. राधिका

आज हॉटेल 'राधिका'चे उद्‌घाटन होणार आहे. अशी भली मोठी जाहिरात वर्तमानपत्रात आली होती. ठरल्यां वेळी उद्‌घाटनाचा सोहळा सुरू झाला. गणपतराव श्यामसह स्वागताला दारातच उभे होते. ''या, या, डॉक्टरसाहेब,'' गणपतराव हसून म्हणाले, ''आपण एकटेच आलात, बाईसाहेब आलेल्या दिसत नाहीत.''

''ती आज जरा कामात आहे.''

''हो का? अरे हो, डॉक्टरसाहेब, हा माझा पुतण्या श्याम.'' श्यामने हस्तांदोलन केले. ''आपण पुढे चला, राधिका आपले स्वागत करायला सज्ज आहे.'' मांडवाच्या प्रवेशद्‌वाराशीच एक अतिरूपवान स्त्री उभी असलेली पाहून डॉक्टर थक्क झाले. तिची उंची डोळ्यांत भरण्यासारखी होती. भरजरीची रेशमी साडी, डोक्यावरचा पदर, गळ्यातला तन्मणी, नाकातली नथ यांवरून तिचा खानदानीपणा दिसून येत होता. डॉक्टरांच्या मागेच कॉलेजच्या प्राध्यापिका सविता मोघे आल्या. समोरच्या स्त्रीचे सौंदर्य पाहून त्या थक्क झाल्या.

''या. या डॉक्टरसाहेब, आपले स्वागत!'' ती स्त्री मोकळेपणाने म्हणाली, ''आपण एकटेच आलात? बाईसाहेब आलेल्या दिसत नाहीत.''

डॉक्टर क्षणभर गडबडलेच. गणपतरावांनी उच्चारलेले शब्द जसेच्या तसे राधिका उच्चारत होती. हिला कसे कळले मी एकटा आलो ते, असा प्रश्नही त्यांच्या मनात आला.

''आपला खुर्चीक्रमांक १३२, डॉक्टरसाहेब,''ती स्त्री म्हणाली. डॉक्टर पाहतच राहिले.

"या सविताबाई, वकीलसाहेब आले नाहीत वाटतं? आणि तुमचा थोरला मुलगा तुमच्याबरोबर येणार होता ना?" त्या स्त्रीने प्रा. मोघेंना प्रश्न केला. "कमाल आहे बाई तुझी! गणपतराव बोलले तेच तू बोललीस."

"तू कोण त्यांची सून का?" सविताबाई म्हणाल्या.

ती स्त्री क्षणभर हसली. "मी राधिका. बरं, आपण पुढं व्हा. खुर्चीक्रमांक २११."



माणसे येत होती. राधिका त्यांना अक्षरशः थक्क करत होती.

"इंजिनियर, आपण फक्त दोघंच येणार होता. पण मुलांना घेऊन आलात, म्हणून मला फार आनंद होतो," ती म्हणाली.

"गणपतरावदेखील हेच म्हणाले नाही का हो?" इंजिनियरच्या पत्नी म्हणाल्या. "त्याचं ठीक आहे, पण तुम्हांला आता बसायला जागा कशी द्यायची? तुमच्या दोन जागा आहेत, १६८ व १६९. पण मुलं आणणार हे तुम्ही कळवलं नव्हतं. तरी हरकत नाही. मी मुलांना जागा देते. एक सेकंद. १३३ व २१२ क्रमांकाच्या जागा रिकाम्या आहेत, त्या तुम्ही घ्या."

"कमाल दिसते हो या बाईची! मांडवातल्या खुर्च्या हिला दिसतदेखील नाहीत आणि तरीही जागा अचूक सांगते," इंजिनियरबाई आपल्या नवऱ्याला म्हणाल्या.

मांडव गच्च भरला. उद्घाटन करणारे मुख्य अतिथी आले. त्यांचे भाषण सुरू झाले.

"गणपतरावांनी सर्वांना गोड धक्का दिला आहे. श्यामच्या बुद्धिमत्तेबद्दल ते मला नेहमीच सांगतात. पण आपली सून इतकी बुद्धिवान आहे, हे त्यांनी मला कधीच सांगितलं नाही."

गणपतराव आभार प्रदर्शनासाठी उभे राहिले. "पंचवीस वर्षांपासून माझं आरोग्यभुवन आपणाला माहीत आहे. आता यापुढं हे काम श्याम व राधिका पाहतील. आपण आलात, आनंद आहे. असेच येत राहा." गणपतराव भारावून बोलत होते.

पाहुण्यांनी उद्घाटन केले. टाळ्यांचा कडकडाट झाला. टाळ्यांचा कडकडाट केव्हा थांबला ते गणपतरावांना समजलेही नाही. ते हरवले होते. निरामय आनंद त्यांना झाला होता.

तेवढ्यात एक घोषणा ऐकू आली — "जेवण खास भारतीय पद्धतीचं आहे. आपण सर्वांनी निवांत जेवावं," राधिका बोलत होती.

भोजनमंडपात खुर्च्या शिस्तीत मांडलेल्या होत्या. सर्वजण बसले. राधिका आत आली. तिच्या दोन्ही हातांवर मोठी प्लेट होती आणि भरलेल्या दहा ताटांची चळत. राधिका हळुवारपणे आली, उभी राहिली. तिने ती चळत टेबलावर ठेवली आणि प्रत्येकासमोर ती ताटे मांडू लागली. कुठे सांडणे नाही की लवंडणे नाही.

सर्वजण अवाक् होऊन पाहत होते. प्रत्येकाच्या ताटात तितकाच भात. प्रत्येक वाटीतील मठ्ठादेखील तितकाच. इतकेच काय, पण मिठाचे प्रमाणदेखील तैंच! जुळे भाऊ पाहिल्यावर मंडळींना जेवढे आश्चर्य वाटणार नाही, तेवढे ही शंभर जुळी ताटे पाहून वाटले! माणसे जेवण विसरली. ते राधिकेच्या हालचालीच पाहत बसले.

स्वस्थ चित्ताने गणपतराव हा सारा सोहळा पाहत होते. त्यांच्या डोळ्यांत आनंदाश्रू आले. धडाडीने नवीन गोष्ट मान्य केली हे चांगलेच झाले, असे त्यांना वाटले. एक वर्षामागील धावपळ त्यांना आठवली आणि श्याम अमेरिकेहून आलेला तो दिवसही आठवला.

तेव्हाचा काळच वाईट होता. अनुभवी नोकर मिळेनात. कामचुकारपणा थांबेना. हे सगळे गणपतराव श्यामला सांगत होते. त्यावर श्याम म्हणाला होता, "मला वाटतं काका, आपण काही कामं यंत्राकडून करून घेतली पाहिजेत. यांत्रिक मानवाची करामत तुम्ही ऐकली असेलच. ती मी प्रत्यक्ष पाहिली आहे. कारण यंत्रमानव तयार करण्याच्या कारखान्यातच मी इंजिनियर आहे."

"यांत्रिक मानवामुळे माझा काय फायदा?" गणपतरावांनी विचारले.

"खूप फायदे आहेत. पहिला, तो संपावर जाणार नाही. दुसरा, तो दिवसभर न थकता काम करील. तिसरा, तो कामचुकारपणा करणार नाही. आळस करणार नाही. तुम्ही म्हणाल तर अक्षरशः चोवीस तासदेखील तो काम करू शकेल. चवथा व सर्वात महत्त्वाचा फायदा म्हणजे, तो तुमच्या आज्ञेत राहील. तुम्ही सांगितले तेवढंच तो करील, इतर प्रश्न करणार नाही."

श्याम अगदी सविस्तर सांगत होता. गोष्टी खूप रंगल्या. पैसे खर्च करण्याची श्यामची तयारी होती. तो म्हणाला, ''काका, तुम्ही काळजी करू नका. यंत्रमानव मी तयार करून आणीन. मला काहीतरी नवीन करून दाखवायचं आहे. नवीन, अगदी नवीन.'' श्यामचे डोळे चमकले. तो पुढे म्हणाला, ''काका, यंत्रमानव मी यांत्रिक स्त्रीच्या रूपानं आणतो.''

आणि त्याने ही राधिका आणली.

''राधिका हे यंत्र आहे. त्याला स्मरणशक्ती आहे. मेंदूसारखं ते काम करतं. फक्त त्याला स्वतःचं मन नसतं. त्यामुळेच भावनेचा ओलावा त्याला नसतो. खरं म्हणजे हीच त्याची जमेची बाजू. गंमत म्हणजे कुठलीही गोष्ट ते स्वतःहून करू शकत नाही; त्याच्यात ती कुवतच नाही. आपणाला जे काम करवून घ्यायचं ते आपण त्याला त्याच्या भाषेत सांगायला हवं. हे सांगणं अतिशय सूत्रबद्ध व तर्कसंगत हवं,'' श्याम सांगत होता.

''पण राधिकेला हे सर्व कसं शिकवायचं?'' गणपतराव मध्येच म्हणाले.

''आम्ही राधिकेला आदल्या रात्री दुसऱ्या दिवशीच्या ऑर्डर्स फीड करतो. सकाळी ती स्वयंपाकाला लागते. तिचे यांत्रिक हात,मसाल्याचे प्रत्येक पदार्थ अगदी नाजूक तराजूप्रमाणे कपात उचलून घेतात. तिला स्वयंपाकाला वेळ लागतच नाही. शंभर माणसांसाठी स्वयंपाक ती एका तासात करू शकते.''

ह्या सगळ्या गोष्टींचा श्यामला अभिमान आणि लोकांना नवल वाटत असे.

पण एका रात्री गोंधळच उडाला. एकदम दीडशे माणसे जेवायला आली. गणपतराव म्हणाले, ''आमच्याकडे आता व्यवस्था होऊ शकणार नाही. कमीत कमी दोन तास आधी ऑर्डर द्यायला हवी. शिवाय ते सर्व श्याम पाहतो. तो गावाला गेला आहे. राधिकेला मी काहीच सांगू शकणार नाही.''

''वा, राव! सूनबाईला घाबरता वाटतं?''जेवायला आलेल्यांपैकी एक-जण म्हणाला.

''ती माझी सून नाही. शिवाय मी तिला काही सांगू शकत नाही.''

"नाही कसं? आम्ही खास आलो आहोत. जेवल्याशिवाय येथून जाणं आम्हांला शक्य नाही. एका तासाच्या आत आम्हांला जेवण मिळालं पाहिजे."

"ते अशक्य आहे."

"अशक्य?"

"गणपतराव, एका तासाच्या आत जर का सर्वांना जेवण मिळालं नाही, तर तुमच्या राधिकेची धडगत नाही एवढं लक्षात ठेवा."

गणपतराव घाबरून आत गेले. राधिका आपल्या जागेवर उभी होती. निर्देश देणारे मशीन गणपतरावांनी सुरू केले. त्यांनी विचारलेल्या प्रश्नांना राधिकेने शेवटी उत्तर दिले—

"मी हे करूच शकणार नाही. वेळ फार थोडा आहे."

गणपतरावांना समजेना. ते घामाघूम झाले आणि एकदम त्यांना श्यामचे बोलणे आठवले. तो म्हणाला होता, 'काका, राधिकेच्या कामाचा वेग आपण नेहमीचाच ठेवतो, पण तो दुप्पट किंवा चौपट करता येतो. त्यासाठी तिच्या कपाळावर जी बिंदी आहे,तिच्याखाली १, २ व ३ या नंबरचे नॉब्ज आहेत. दोन क्रमांक दाबल्यास दुप्पट व तीन दाबल्यास चौपट वेगाने ती काम करू शकते.'

गणपतरावांना काही सुचत नव्हते. ते एकदम राधिकेसमोर आले व त्यांनी एकदम तीन हा नॉब दाबला.

चमत्कार झाला. राधिका अक्षरशः धावू लागली. ती स्वयंपाकघरात गेली.

गणपतरावांना ती चाळीस मिनिटे युगासारखी वाटली. इतक्यात त्यांच्या टेबलावरील टेलिफोन वाजू लागला. "स्वयंपाक तयार आहे. दहा मिनिटांत सर्व ताटे मी आणते," राधिका बोलत होती.

सर्वांच्या खुर्च्या मांडणे, भांडी ठेवणे ही व्यवस्था तिने अवघ्या दहा मिनिटांत केली.

मंडळी आपापल्या जागेवर बसली. उद्घाटनाला यापेक्षा दुप्पट माणसे होती, पण ती सगळी शिस्तीत बसली होती. ही मंडळी मात्र बेशिस्तीचे प्रदर्शन

करत होती.

गणपतराव कोपऱ्यात उभे होते.

राधिका वेगाने हॉलमध्ये आली. ताटांची चळत तिच्या हातातील प्लेटवर होती. पाहुण्यांपैकी काहीजण धावत तिच्याजवळ गेले. 'आम्हांला आधी द्या' म्हणून आणखी जवळ गेले.

''मला स्पर्श करू नका,'' राधिका किंचाळलीच.

''फारच शिष्ट आहे गणपतराव, तुमची सूनबाई,'' कोणीतरी खिकाळले. तेवढ्यात राधिकेच्या अंगाला त्या व्यक्तीचा स्पर्श झाला आणि विजेचा शॉक लागल्यासारखा तो मनुष्य एकदम आडवातिडवा पडला, तो नेमका राधिकेच्या पायांत. ती अडखळली. तिच्या हातातील सर्व ताटवाट्या इतस्ततः पसरल्या. कोणाच्या शर्टावर, कोटावर वरणभाजी आदळली. एकदम गोंधळ सुरू झाला.

''गणपतराव, हे ठीक झालं नाही,'' कोणीतरी ओरडले. राधिका हॉलच्या मध्यभागीच पडली होती. तिच्याकडे लक्ष द्यायला कुणाला वेळ नव्हता. भुकेलेल्यांनी खुर्च्या फेकल्या. चिडून टेबले उलटी केली.

तेवढ्यात श्याम आला. त्याने पाहिले, गणपतराव कपाळाला हात लावून बसले आहेत. श्यामला पाहताच ते म्हणाले, ''आपण बुडालो श्याम, राधिकेला तू आधी उभी कर.''

श्यामला सारे कळून चुकले. ''काका, राधिका फक्त शिस्तशीर लोकांसाठीच आहे. हुल्लड करणाऱ्यांसाठी नव्हे! लोकांत सचोटी, शिस्त नसेल तर यंत्रमानवही काही करू शकत नाही.''

''पण एवढी मोठी ताटांची चळत आणून राधिकेनं चूक केली, असं मला वाटतं,'' गणपतराव म्हणाले.

''नाही काका, तुम्ही तिला सर्व हालचाली चौपट वेगानं कर म्हणून ऑर्डर दिली होती. मी मागं तुम्हांला म्हणालो होतो, कॉम्प्युटर कधी चुका करत नाही. चुका फक्त माणसाच्या हातून होतात.''

## शब्दार्थ व टिपा

**निरामय** — निर्मळ. **चळत** — चवड. **अवाक्** — गप्प. **निर्देश** — विशिष्ट सूचना. **नॉब** — कळ. **फीड करणे** — कॉम्प्युटर शास्त्रातील हा तांत्रिक शब्द आहे. आपल्याला इष्ट असलेली माहिती किंवा प्रक्रिया त्या यंत्रामध्ये आधीच भरून किंवा जुळवून ठेवावी लागते. मग ते यंत्र कळ दाबताच आवश्यक ते कार्य करते.

## स्वाध्याय

१. उद्‌घाटनाला आलेल्या सविता मोघे थक्क का झाल्या?
२. 'तुम्हांला आता बसायला जागा कशी द्यायची?' असे राधिका इंजिनियरच्या पत्नीला का म्हणाली?
३. राधिका जेवण वाढताना सर्वजण अवाक् होऊन का पाहत होते?
४. श्यामने यांत्रिक मानवाचे कोणते फायदे सांगितले?
५. 'चुका फक्त माणसाच्या हातून होतात,' असे का म्हटले आहे?
६. 'यंत्र एक वरदान' यावर दहा ओळी माहिती लिहा.

## व्याकरण

- ज्या शब्दाच्या रूपात लिंग, वचन, विभक्ती किंवा इतर कोणतेही प्रत्यय लागून बदल होत नाही त्याला **अव्यय** असे म्हणतात.

  उदा. तो दारा**पर्यंत** पोचवायला आला.
  राम **आणि** सीता वनात गेले.
  **वाहवा**! **वाहवा**!! चेंडू हा, सुंदर कितीतरी खचित **अहा**!

  वरील वाक्यांत पर्यंत, आणि, वाहवा , अहा या शब्दांच्या रूपात कुठल्याही प्रकाराने बदल होत नाही म्हणून त्यांना **अव्यये** म्हणतात.

- खालील वाक्यांतील अव्यये ओळखा :

  'गणपतरावदेखील हेच म्हणाले.'
  'पण तुम्हांला आता बसायला जागा कशी द्यायची?'
  'मांडवातल्या खुर्च्या हिला दिसत नाहीत, आणि तरीही जागा अचूक सांगते.'

# २१. रंगाची किमया

(गुंड्या आणि चिमी ड्रॉईंगच्या कागदावर आकृत्या काढत बसले आहेत.)

**गुंड्या :** चिमे, चिमे, माझा हा हिंदुस्थानचा नकाशा कसा आलाय तो बघ ग!

**चिमी :** थांब रे गुंड्या, बाईंनी आम्हांला चहाची किटली काढायला सांगितली आहे. तिला मी लाल रंग देत आहे.

**गुंड्या :** अँ! चहाच्या किटलीला लाल रंग? अग, किटली पिवळ्या नाहीतर पांढऱ्या रंगाची असते.

**चिमी :** मला किनई गुंड्या, लाल रंग आवडतो. माझी रिबिनदेखील लाल रंगाची आहे.

**गुंड्या :** हो! आणि तुझी लाल रंगाची किटली पाहून बाई तुझा गालदेखील लाल रंगाचा करतील.

**चिमी :** का म्हणून?

**गुंड्या :** चिमे चिमे, कमरेवर हात ठेवून 'का म्हणून' विचारल्याबद्दल बाबांनी तुझं नाक ओढलं होतं, ते आठवतंय ना?

**चिमी :** पण का म्हणून? मी एका चित्रात माणसांना हिरवा रंग दिलेला पाहिला आहे.

**गुंड्या :** अग, तसंच बोलायचं झालं, तर मीदेखील चित्रात माणसं चौकोनी पाहिली आहेत.

**चिमी :** आणि एका चित्रात माणसाला चेहेराच नव्हता.

**गुंड्या :** अग, पण हे सगळं मोठाल्या चित्रकारांनी करायचं असतं. आपण जर किटलीचा कान माणसाच्या कानासारखा काढला, तर बाई आपला कान किटलीच्या कानासारखा करतील.

चिमी : पण का म्हणून? आम्हांलादेखील मोठा चित्रकार व्हायचं असलं तर?....

गुंड्या : परत आलं तुझं 'का म्हणून'? आता बाईच देतील उत्तर तुझ्या ह्या प्रश्नाला.

चिमी : खरंच का रे बाई मारतील मला?



**गुंड्या :** तसंच काही नाही. कदाचित दहा पानांचा धडा दहा वेळा लिहून आणायला सांगतील.

**चिमी :** अय्या! नको ग बाई. लिहून लिहून माझे हात दुखायला लागतील आणि मग मला सागरगोटे नीट खेळायला यायचे नाहीत.... मग शेजारची बनीदेखील माझ्यावर हप्पी लावील.

**गुंड्या :** म्हणून सांगतो, की तू आपली लाल किटली जरा पिवळी कर.

**चिमी :** ती कशी रे करता येईल?

**गुंड्या :** मला वाटतं, लाल रंगात हिरवा रंग मिसळला तर पिवळा रंग तयार होतो. पाहू या आपण हिरवा रंग वर लावून...

**चिमी :** नको हं गुंड्या.... बघ....

**गुंड्या :** अग, पाहू तर खरी गंमत जरा. हं, हा पाहा लहानसा हिरव्या रंगाचा ठिपका मी तुझ्या किटलीवर टाकला.

**चिमी :** हा तुझा ठिपका वाटतं ! केवढा तरी मोठा डाग पाडलास तू चांगला माझ्या किटलीवर!

**गुंड्या :** थांब ग. आता किटलीचा रंग पिवळा होईल पाहा.

**चिमी :** कुठं रे? काहीतरी गप्पा मारतोस तू. हिरवाच तर दिसतो आहे तुझा डाग.

**गुंड्या :** अँ! कसा नाही होत पिवळा? आव मंतर, जाव मंतर, छूः!

**चिमी :** चले जाव! फसवतोस काय मला?

**गुंड्या :** थांब ग. सावकाश होईल तो रंग पिवळा. उद्या सकाळी उठून पाहा, म्हणजे समजेल तुला गंमत!

**चिमी :** तर तर! म्हणे उद्या सकाळी उठून पाहा. उद्या शाळा आहे सकाळीच. म्हणजे नवी किटली काढायला वेळदेखील नाही मिळायचा. अन् मग लाल नि हिरवी किटली घेऊन जावं लागेल मला शाळेत.

**गुंड्या :** अग, तसं नाही ग!

**चिमी :** नाही कसं? दे आता आमची किटली दुरुस्त करून. नाहीतर सांगेन आईला!

**गुंड्या :** पाहिलंस? असंच आहे तुझं, तुला मदत करायला गेलं म्हणजे तू अशी आमच्याशी भांडण करतेस. आता आईला नाव सांगणार आहेस ना तू?

**चिमी :** हो सांगणारच मुळी. तू माझ्या किटलीला का हात लावलास?

**गुंड्या :** पण असं पाहा चिमे, एवीतेवी तुझी लाल रंगाची किटली पाहून बाईंनी तुला मारलंच असतं....

**चिमी :** का म्हणून? आम्ही सांगितलं असतं, की किटलीवर चहा सांडलाय!

**गुंड्या :** अग, पण हा तुझा लाल रंग चहासारखा दिसत नाही. गंधासारखा दिसतो आहे.

**चिमी :** ते काही नाही. आपला हिरवा रंग तू काढून घे....

**गुंड्या :** अग, पण आपल्या घराच्या भिंतीचा हिरवा रंग जरी हात लागल्यावर जात असला, तरी हा हिरवा रंग जायचा नाही.... मला वाटतं, आपण ही सगळी किटलीच हिरवी करू या....

**चिमी :** अरे, अरे पण जरा सांभाळून... किटलीचा कान रंगानं भरून टाकलास ना? आता तो सुजलेल्या गालासारखा दिसायला लागलाय.

**गुंड्या :** थांब ग. रंगानंच ही किटली आता मोठी करूया आणि एक नवा कान तिला जोडूया.

**चिमी :** अय्या! ही किटली तर आता हिरव्या गवताच्या गंजीसारखी दिसायला लागली की रे!

**गुंड्या :** अरेच्या! खरंच की. आता मी एक गाढव ह्या गवताच्या गंजीजवळ काढतो, म्हणजे मग बाई इतक्या खूश होतील तुझ्यावर....

**चिमी :** मला बनवतोस काय? म्हणे गाढव काढीन. पण किटलीच्या कानात तुला रंग भरता येत नाही, तर तू गाढवाच्या चिंचोळ्या कानांत कसा

रे रंग भरणार? अयाई ग. काय झालं हे माझ्या किटलीचं... आईला नाव सांगते मी आता.... आई, ए आई.

**गुंड्या :** (घाबरून) अग, ओरडू नको मोठ्यानं. आताच खोबरेल तेलाची बाटली बाबांच्या कोटावर सांडली म्हणून आईनं मला नाही का मारलं? दया कर माझ्यावर.. (थोडं थांबून) हां चिमे, एक युक्ती सुचली... माझा हिंदुस्थानचा नकाशा अर्धा काढून झाला आहे. हा बघ....

**चिमी :** अगबाई! हा अर्धा नकाशा तर थेट अगदी माझ्या किटलीसारखा दिसतो आहे!

**गुंड्या :** कसं बोललीस! ह्याला म्हणतात हुशार मुलगी. आता असं कर... हा बंगाल आहे ना? त्याचा कर किटलीचा कान आणि हे काश्मीर आहे ना? त्याचं कर किटलीचं झाकण. माझा हा गुजरात अन् हे पंजाब इतके निमुळते झाले आहेत, की ते किटलीच्या तोटीसारखे दिसत आहेत.

**चिमी :** अय्या! खरंच गडे. आणि ह्या सातपुड्याची वाकडी झालेली कंबर जरा सरळ केली की छान किटली होईल नाही का रे! पण आता तुझा नकाशा माझ्या वहीत कसा आणायचा?

**गुंड्या :** अगदी सोपं आहे. माझी नकाशाची वही आहे, ती कर तुझी ड्रॉइंगची वही आणि तुझी ड्रॉइंगची वही मी करतो माझी नकाशाची वही. पहिलाच नकाशा आणि पहिलंच ड्रॉइंग आहे ह्या वर्षातलं. तेव्हा चालून जाईल अदलाबदली.

**चिमी :** हो रे हो. आणि माझी किटलीसुद्धा आता अगदी अर्ध्या हिंदुस्थानसारखी झाली आहे. किटलीची तोटी झाली आहे गुजरातइतकी लठ्ठ आणि किटलीच्या कानाचा झाला आहे बंगाल!

**गुंड्या :** शिवाय त्या कानाखाली रंगाचे ठिपके पडून बंगालच्या उपसागरातील बेटंही तयार झाली आहेत.

**चिमी :** आणि रंग खाली ओघळून किटलीच्या बुडाचा सातपुडा पर्वत झाला आहे.

**गुंड्या :** बस्स. आता विदूषकाच्या उलट्या टोपीप्रमाणे दक्षिण हिंदुस्थान तुझ्या किटलीला जोडला, की झाला सगळा हिंदुस्थान तयार.

**चिमी :** किती गंमत आहे, नाही रे. खूप मार्क मिळतील आता आपल्या ड्रॉइंगला आणि नकाशाला.

**गुंड्या :** मला वाटतं चिमे, मोठे चित्रकारदेखील अशाच युक्त्या करत असले पाहिजेत. उगीच का त्यांच्या माणसांचे कान किटलीच्या कानासारखे दिसतात? ते काही नाही. आपण तर बुवा आता मोठे चित्रकार होणार!

**चिमी :** आणि मीही मोठी नकाशातज्ज्ञ होणार!

## शब्दार्थ व टिपा

**हप्पी** — सागरगोट्यांच्या खेळातला एक डाव. **गंजी** — ढीग.

## स्वाध्याय

१. गुंड्याने किटलीचे चित्र कसे बिघडवून टाकले?

२. गुंड्या व चिमी यांनी आपल्या वह्यांची अदलाबदल करण्याचे का ठरवले?

३. मोठा चित्रकार होण्याची गुंड्याची कल्पना तुमच्या शब्दांत लिहा.

४. हा पाठ वाचताना हसू येणारा प्रसंग लिहा.

५. चिमी बोलताना नेहमी 'का म्हणून' असे म्हणते. ही तिची बोलण्यातील लकब आहे. तुमच्या मित्राच्या बोलण्यातील काही लकब सांगा.

६. गंगाधर गाडगीळ यांचे 'बंडू' व ना. धों. ताम्हनकर यांचे 'चिंगी' ही पुस्तके मिळवून वाचा.

# २२. हसावी पहाट घरोघरी

घोटभर पाणी
घासभर चारा
मायेचा उबारा ... मिळो सर्वां

अभाळ शिवले
असो शिरावर
हात पाठीवर ... शक्तिशाली

गळो न शरीर
ऊन-पावसात
कुणी लक्तरात ... राहू नये

ओठावर हसू
फुलो सदाकाळी
वाजवावी टाळी ... सुखासुखी

एक तळावर
एक माळावर
वेगळा संसार ... कशासाठी?

सर्वांच्या पाऊला
मिळो एक वाट
हसावी पहाट ... घरोघरी





## शब्दार्थ व टिपा

**अभाळ शिवले** — संकटे कोसळणार नाहीत अशी अवस्था. **लक्तर** — फाटके कपडे.

## स्वाध्याय

१. कोणकोणत्या गोष्टी सर्वांना मिळाव्या, असे कवीला वाटते?
२. सर्वांनी सुखी असावे, असे कवीने कोणत्या शब्दांत सांगितले आहे?
३. 'कुणी लक्तरात राहू नये', 'ओठावर हसू फुलो सदाकाळी' यांतील कल्पना स्पष्ट करा.
४. सुखासुखी, घरोघरी यांसारखे तीन शब्द लिहा.
५. शेतकरी किंवा कामगारांच्या वस्तीला भेट देऊन त्यांच्या जीवनाची माहिती करून घ्या व दहा वाक्यांत लिहा.

# २३. पाटीची करामत

बाजारात दादांच्या बरोबर जाऊन मी ही पाटी आणली होती. पहिल्या दिवशी शाळेत गेलो तेव्हा दादांनी नारळ फोडून मुलांना खोबरं, चिरमुरं नि भेंडबत्तासूच्या कांड्या वाटल्या होत्या. पोरं खूश झालेली. त्यांनी पाटी निरखून बघितली. रंगीत अंकलिपीचा वास घेऊन बघितला. पांढऱ्या बारीक दोऱ्यानं एका कानाला बांधलेल्या चाळशीतनं बघत गुरुजींनी मला पांढराशुभ्र 'श्रीगणेशा' खडूनं पाटीवर काढून दिला. त्याच्यावरनं लेखणी फिरवत मी दिवसभर बसलो. दिवसभर ती अक्षरं जपून ठेवली नि संध्याकाळी अबदार धरून घराकडं घेऊन आलो.

घरात काहीतरी आक्रीत आल्यासारखं आईला वाटलं. तिनं ती पाटी हातात घेऊन 'तू काढलंस हे समदं?' म्हणून कौतुकानं विचारलं. मी 'हो' म्हणालो आणि आईकडनं शेंगागूळ उकळला. पाटीपेन्सिल नि अंकलिपी देव्हाऱ्याच्या खोलीत नेऊन ठेवली. रात्री दादा मळ्याकडनं आल्यावर त्यांनीही त्या अक्षराचं कौतुक केलं.

रोज सकाळी उठून मी ती पाटी घेऊन बसे. तासाभरानं आई तिथून उठवून मला तोंड धुवायला, अंघोळीला लावून देई. 'बरं का, आता तू शाळंला जातोस, यळसरी तोंड धुवावं, आंघूळ करावी. मग शाणा हुशील, शिकून मामलेदार हुशील,' असं काहीतरी बोलून ती सकाळच्या सगळ्या गोष्टी माझ्याकडनं करून घेई. एरवी पोटात भर पडल्यावर नुसतं तोंड खंगाळणं; अंघोळ कधी दोनदोन, तीनतीन दिवस तर नसेच, पण पाटीनं वळण लावलं.

आरंभी पाटी खूप आवडली. एक दीस आड तरी तिला मी कोळशानं घासून अंघोळ घालत असे. ती काळीभोर दिसे. तिच्यावर 'श्रीगणेशा' काढत



असे. साखळीची नक्षी काढत असे. पाढे काढायचं शिकवलं नसल्यामुळं आमच्याच वर्गाशेजारी खांबापलीकडे बसणाऱ्या वरच्या वर्गातील मुलांची झडती बघून, तशाच किरमिज्या आकाराच्या रचना मी दोन रेघांच्या चिंचोळीत तयार करत असे. आईला ते दाखवून खायला मिळवत असे.

सुटीच्या दिवशी पाटी आणि अंकलिपी मळ्याकडंही घेऊन जाई. सगळ्या मळ्याभर माझ्या बाराखड्या नि कविता घुमत असत. मळ्याचे कान टवकारत. मात्र 'बकऱ्या'ला 'एडका' का म्हणतात, माणसांच्या 'घोळक्या'ला 'थवा' का म्हणतात, 'शिक्क्या'ला 'ठसा' का म्हणतात, 'धनुष्यबाण घेतलेल्या माणसाला' 'क्षत्रिय' का म्हणतात, 'दोना'च्या पाढ्यालाच तेवढं 'बे'चा पाढा असं का म्हणतात — असे अनेक प्रश्न त्या वेळी पडायचे. कदाचित एका वस्तूला असं दुसऱ्या नावानं बोलवायला शिकायचं म्हणजेच 'शुद्ध बोलायला' शिकायचं अशी माझी कल्पना काही काळ झाली होती. पण मी त्याबद्दल कुणालाच विचारलं नाही. मी काही बोलायचाही नाही आणि विचारायचाही नाही. गप घुम्यासारखा समजेल तेवढं पदरात पाडून घ्यायचा. पाटी जवळ धरून तिच्या अंगावर काहीतरी काढायचा.

पाढे येईनात तसा त्या पाटीचा कंटाळा येऊ लागला. आताशा खुरपी, कासरे, जुपण्या, बुट्ट्या यांसारख्या शेतसामानात ती कुठंही पडलेली असायची. खरं म्हणजे ती काय शेतसामान नव्हती. त्यामुळं त्या ढिगात चमत्कारिक दिसायची. तरीही ती पाटी मला दुसरी-तिसरीत गेल्यावर आवडू लागली. गुरुजी कडक असले तरी शाळेत घरातल्यासारखी कुणी कामं लावत नसे. मळ्यात पाचसात वर्षांच्या पोरापासनं सत्तरीच्या थोरापर्यंत सगळ्यांनाच रातध्या.... कामं करावी लागत. मला त्यातनं ही पाटी सोडवून शाळेत आणी. सावलीला बसवी.

तिनं अक्षरांची ओळख करून देऊन अनेक पुस्तकं वाचायला शिकवली, अनेक गणितं आणि हिशेब सोडवून पास केलं, चित्रं काढून मनोरंजनही केलं... तिला मी जपू लागलो. स्वभावानं दादांसारखी करडी होती, पण जवळीकही साधत होती. एखादं गणित पटकन सोडवून दिलासा देत होती. ज्या खुंट्यांवर सोंदोरनाडे, दोऱ्या, मुसकी नि रिकाम्या पोत्यांच्या वळकट्या अडकल्या जात, तिथंच आई पाटीलाही अडकवून टाकी. नव्या नाड्याच्या गोल कोपरीत ती मध्ये सुरक्षित पडून राही. ज्या दारांवर, भिंतींवर शेणाचे

शिंतोडे उडालेले असत त्याच दारांवर, भिंतींवर, भुईवर मी पेन्सिलीनं, खडूच्या तुकड्यानं गणितं सोडवी. आईला दुधाचे, शेणकुटाचे, भाजीपाला विकल्याचे हिशेब करून देई. अशा रीतीने शेणाची आणि ही लिहिण्याची पाटी एका जागी येत होती... मोरावरची सरस्वती इथं धान्याच्या पोत्यावर बसत होती. तिच्या एका हातात सतारीऐवजी भोपळा आणि पोथीऐवजी खुरपं असे. अक्षराची ओळख पहिल्यांदाच ह्या घराला होत होती.

या पाटीची संगत सुटण्याचे अनेक प्रसंग येऊन ठेपले. चौथी संपली. नऊदहा वर्षांचा झालो. पाण्याची दारं मोडता येऊ लागली, गुरं राखता येऊ लागली, शेरडं, म्हसरं घराकडची रानाकडं, रानाकडची घराकडं नेता येऊ लागली. दादांना वाटलं, 'पोरगं आता हाताबुडी आलंय. कामाला जुपावं.' त्यांच्या मनात विचार आला नि त्यांनी पाटीदप्तर गुंडाळून ठेवायला सांगितलं. 'हिशेबापुरतं लिवणं रगाड झालं, आता शेतात काम करायला चल,' दादा म्हणाले.

मला वाईट वाटलं, पण इलाज नव्हता. मी पाटी ठेवून गोठ्यातलं शेण भरू लागलो.

वर्ष तसंच गेलं. अधनंमधनं गुरुजींकडं रातचं जात होतो. कविता करून दाखवत होतो, चित्रं काढून दाखवत होतो, त्यांच्या कविता ऐकत होतो. शाळेत नव्हतो तरी शाळेच्या वाढदिवसासाठी होणाऱ्या कार्यक्रमात गाणी म्हणत होतो, नकला करत होतो. माझी शाळा बंद होतेय हे बघून गुरुजींना वाईट वाटलं.

वर्ष तसंच गेल्यावर दुसऱ्या वर्षी त्यांनी दादांची समजूत काढली, 'पोरगं सातवीपर्यंत शिकू दे. सातवी झाल्यावर बऱ्यापैकी नोकरी लागेल. हुशार आहे, चांगला पगार मिळेल. दोन-तीन वर्षांचा तर प्रश्न आहे. शाळा दुपारी अकरा ते पाच असते, तेव्हा सकाळ-संध्याकाळ पोरगं मळ्यात काम करीलच की.' दादांना ते पटलं. 'तीन वर्षांत सातवी आणि सातवीनंतर पोराला चांगली नोकरी' हा हिशेब त्यांना पटला. त्यांनी मला पुन्हा शाळेला घातलं.

पुन्हा पाटीशी संबंध आला. सकाळपासनं उसातल्या चिखलानं पाय मळलेले, उन्हानं अंग घामेजलेलं, हातात पाटीपुस्तक घेऊन शिकू लागलो. पुस्तकाच्या पानापानांवर चिखलाचे डाग पडू लागले.

सकाळी तीन-चार तास, संध्याकाळी तास दोन तास मळ्यातली कामं ओढतच होतो. शाळेला जायला कधी बारा वाजायचे, तर कधी एक. पण गुरुजींनी माझं पाटीवरचं प्रेम आणि डोकं बघून सगळ्या सवलती दिल्या. कसाबसा सातवी झालो.

सातवीनंतर पुन्हा खंड पडला. नोकरी मिळालीच नाही. दादांचा भ्रमनिरास झाला. त्यांना वाटलं,दोन-तीन वर्षं फुकट गेली. तेवढ्या काळात मी मळ्यात राहिलो असतो,तर दोन-तीन वर्षं एक गडी वाचला असता.त्याचा तीन वर्षांचा पगार वाचला असता. घरचं माणूसही मळा धरून राहिल्यानं चोरीमारीला आळा बसला असता.

त्याचं उट्टं म्हणून त्यांनी मला मळ्यात रातध्या.... डांबलं.आसपासच्या मळेकऱ्यांनी माझा पार अगदी 'आंदबा' करून टाकला. मी पटकापुंजी नेसून गावात येऊ-जाऊ लागलो.

पाटी अधनंमधनं हाताला लागत होती. तिच्यावर चित्रं काढतच होतो. कविता जुळवत बसत होतो. मनासारखी जुळली की वहीत उतरून ठेवत होतो. तिची संगत सुटू नये असं वाटत होतं. मळ्यातली कामं उपसत होतो. एवढी कामं उपसूनही पोटभर भाकरी मिळत नव्हती. एक दिवसही इस्वाटा नाही. सुका दुष्काळ, ओला दुष्कांळ, उपासमार, आई-दादांची भांडणं, रात्रंदिवस कुत्र्यासारखं मळा धरून पडणं मला असह्य होत होतं. हे जगणं जनावराचं आहे,याची अंधूक जाणीव पाटीनं दिली होती. मला या जगण्यातनं बाहेर पडायचं होतं. त्यासाठी पाटीच तारील असं वाटत होतं.

दोन वर्षं अशीच गेली. आठवीत असलेल्या आबाजीकडं रात्री जाऊन पुस्तक वाचू लागलो. इंग्रजी समजून घेऊ लागलो. त्यातही पुन्हा शेकडो अडथळे आले. हुशारी बघून हायस्कूलच्या हेडमास्तरांनी आठवीच्या परीक्षेला



बाहेरून बसायला परवानगी दिली. फी फक्त भरायची. तशीच नववी झाली, दहावी झाली. फीसाठी हात दिला, तो मला येत असलेल्या नकलांनी. दोन-तीन वेळा बघून पाठ झालेल्या दोन-तीन मराठी चित्रपटांनी. जिल्ह्यातल्या अनेक शाळांतून नकलांचे कार्यक्रम केले नि फी, पुस्तकं, कपडे यांचे पैसे गोळा केले. दादा एकही पैसं द्यायला तयार नव्हते. ज्या दिवशी परगावी कार्यक्रमाला जाई, त्या दिवशी पगारी गडी मळ्यात लावून मी त्याचे पैसे देई, असे हाल झाले. दादांना माझं शिक्षणच नको होतं. त्यातच एस. एस. सी. झालो, तसा एम. ए. झालो मराठी साहित्याचा प्राध्यापक झालो. आणि लिहिता लिहिता 'आनंद यादव' झालो... सगळी त्या पांढऱ्या पाटीवरच्या 'श्रीगणेशा'ची करामत!

## शब्दार्थ व टिपा

**अबदार** — हळुवार. **आक्रीत** — नेहमीपेक्षा वेगळे, विपरीत. **यळसरी** — वेळेवर. **खंगाळणे** — धुणे. **झडती** — पाढे, गणती. **सोंदरनाडे** — मोटेच्या सोंडेचा दोर, नाडा. **हाताबुडी** — काम करण्यास योग्य. **इस्वाटा** — विश्रांती. **पाण्याची दारं मोडता येणे** — पिकास पाणी देता येणे.

## स्वाध्याय

१. घरी आणलेल्या पाटीचे स्वागत कसे झाले?
२. सुरुवातीला लेखक पाटीवर काय लिहीत असे?
३. दुसरी-तिसरीत गेल्यावर पाटी लेखकाला का आवडू लागली?
४. पाटीने लेखकाच्या जीवनात कसा व काय बदल घडवून आणला?
५. शेतकामात खालील सामानाचा काय उपयोग होतो ते लिहा.
खुरपी, कासरे, बुट्ट्या, जुंपण्या, मुसकी, सोंदर-नाडे.
६. प्रादेशिक भाषेचे प्रमाणभाषेत रूपांतर करा.
हाताबुडी आलंय, लिवणं रगाड झालं, तू काढलंस हे समदं.
७. 'साक्षर जनता, भूषण भारता' यासारखी साक्षरतेचे महत्त्व विशद करणारी वचने गोळा करा.
८. शाळा चुकवणाऱ्या तुमच्या मित्राला तुम्ही काय सांगाल? दहा वाक्यांत लिहा.

## व्याकरण

- खालील परिच्छेदात योग्य त्या विरामचिन्हांचा वापर करा.

दादा दादा आपल्याला कुत्र्याचं पिल्लू चिंत्या काय रे आणलंस ते देतोस फेकून का येऊ चिंतू जीव घेऊन पळाला व स्वयंपाकघरात गेला आई आई हे बघ काय आणलय मी चिंत्या इथं कशाला आणलंस ते स्वयंपाकघरात काय करावं या पोरट्याला वाटेल ते घेऊन येतो रस्त्यावरचं अहो

# २४. ऋतुचक्र

मे महिन्याच्या शेवटी शेवटी केव्हातरी एखादया संध्याकाळी पावसाळा येणार ह्याची वर्दी येते. सोसाट्याचा वारा सुटतो, पालापाचोळा उडून सैरावैरा धावू लागतो. वाऱ्याच्या भोवऱ्यात सापडून आभाळाला पोचू पाहतो आणि थकून पांगून जातो. असे होता होता वाऱ्याचे वादळ होते. पिसाटल्यासारखे भरारते. घरावरची कौले, छपरांचे पत्रे उडवून लावते. मेघांचा गडगडाट होतो. विजा तळपू लागतात आणि सपाटून पाऊस पडतो. पागोळ्या गळू लागतात, नाल्या वाहतात, डबकी साचतात. मुले अंगणात येऊन नाचतात, मोठी माणसे वर-खाली, इकडे-तिकडे पाहू लागतात आणि तेवढ्यात पाऊस विसावतो.



काही थोडे ढग मागे राहतात, एखाददुसरी सर सोडतात आणि दिसेनासे होतात. हुतुतूच्या खेळात बाकीचे गडी बाद झाल्यावर एखादाच मागे राहून कोणाला टांग मार, कोणाला टपली मार करतो आणि 'तू तू तू' पुटपुटत माघारी जातो तसे.

मग हवा निवळते. सगळीकडे स्वच्छ होते. थोडे गारही वाटू लागते. असेच काही दिवस जातात.

पुन्हा दोनदोन, चारचार लहान-मोठे ढग येऊ लागतात. हळूहळू त्यांची संख्या आणि आकार वाढतात. त्यांच्यातला वेगळेपणा नाहीसा होतो. एक दिवस सगळे आकाश या टोकापासून त्या टोकापर्यंत ढगांनी व्यापते. सगळे आभाळ म्हशीच्या पोटासारखे काळे-जांभळे होते. जडजड होत जाते. खालीखाली उतरू लागते. पाऊस त्यात मावेनासा होतो आणि पाऊस कोसळू लागतो. तो नुसता खाली पडत नाही, तर वरून कोणीतरी दाबून फवारा मारावा तसा सहस्त्रधारांनी मारा करत येतो.

पावसाळ्यात परिसराचे सगळे रूप बदललेले असते. तांबूसपिवळे डोंगर हिरवेगर्द झालेले असतात. त्यावरून जिकडेतिकडे दूधसागर आणि गिरसप्पा उतरत कोसळत असतात. पाऊस असेल त्या मानाने ते फोफावतात किंवा रोडावतात. पण ओघळत म्हणा, कोसळत म्हणा, पावसाळाभर ते असतातच. शेते-झाडे, पावसाचे पाणी पी-पिऊन आणि जमिनीतला रस शोषून काळी झालेली असतात. ढगासारखीच जीवनरसाने जणू ओथंबून जातात. शेतात पाणी साचून त्यांचे आरसे झालेले असतात आणि त्यांत जाता-येता ढग आणि पक्षी, चंद्र आणि सूर्य, तारका आणि नक्षत्रे आपली रुपडी पाहत असतात. सगळ्या मोकळ्या जागा हिरव्या-हिरव्या गवताने आणि सखल जागा निळ्या पाण्याने भरलेल्या असतात. वाट सापडेल तिथे पाणी धावत असते आणि धावताना खळखळत असते. लहान मुलांच्या निर्मळ हसण्यासारखे. निसर्ग कोणाला पाहायचा असेल तर त्याने ह्या दिवसांत पाहावा आणि आठवणीतून ओसंडतील इतकी दृश्ये साठवून घ्यावीत.

सगळीकडे पसरलेल्या हिरव्यात असंख्य वेगवेगळ्या छटा असल्या तरी त्यात एक प्रकारचा तोचतोचपणा असतोच. त्याची जाणीव होऊ लागते तोच झाडाझुडपांना फुले येऊ लागतात. पारिजातावर मोती-पोवळ्यांच्या राशी चढतात. हिरव्या-काळ्या मर्दानी सागांच्या माथ्यांवर डौलदार शुभ्र तुरे डुलू लागतात. शेवग्यांवर फुलांचे पांढरे घोस ओळंबू लागतात. कदंबांच्या फांद्यांना पालवीच्या चोची फुटू लागतात. त्यांचे मोठे पंख होतात आणि हळूहळू त्यातून 'प्रकट' गेंद दिसू लागतात. त्यांचे ते सतेज पण फिकट पिवळेपण अधिक वेधक, की त्यांचा मखमली स्पर्श अधिक सुखावह, असा पाहताना संभ्रम पडतो.

दृष्टिरेषेच्या वरच्या बाजूला ही अशी रंगांची विविधता उठून दिसू लागते. त्याच वेळी जमिनीच्या अधिक जवळ झेंडूवर एक पदरी, अनेक पदरी गोंडे फुलू लागतात. पांढरा, जांभळा तेरडा पाकळ्या विखरू लागतो आणि रानझुडपांवर रंगीबेरंगी टिकल्या उमटू लागतात.

पावसामागोमाग नाना प्रकारचे पक्षी येतात आणि ते आल्याखेरीज वसंतापासून येऊन राहिलेले कोकीळ जात नाहीत. पाचूसारख्या हिरवळीवर, इंद्रनीलासारख्या पाण्यावर आणि म्हशींच्या काळ्याशार पाठींवर अलगद बस-ऊठ करणारे शंखशुभ्र बगळे आधी दिसू लागतात. त्यांच्या मागोमाग रात्रीच्या वेळी पाणथळ जागी किर्रर्र-किर्र करणारे आणि झुडपा-कुंपणांच्या आडोशाला लपणारे पाणकोंबडे येतात. कोकिळचे गाणे, जाणे-येणे मंदावत जाते तसे बुलबुल येऊ लागतात. त्यांच्या सोबतीने आणि त्यांच्या मागोमाग आणखीही पक्षी येत असतात. किती आकारांचे, किती प्रकारांचे, किती विविध रंगांचे! मुठीत मावतीलशा हिरव्यापिवळ्या, निळ्याजांभळ्या, तांबूसतपकिरी चिमण्यांपासून तो भल्या मोठ्या भारद्वाजापर्यंत आणि त्यांचे ओरडणेदेखील कानाला हळुवार स्पर्श करणाऱ्या शिळेपासून तो अंतःकरणाचा भेद करणाऱ्या भुभुःकारापर्यंत विविध.

पावसाळा ओसरून घटस्थापनेचे दिवस जवळ येत चालले, की तळ्यात तांबडी-पांढरी कमळे झळाळू लागतात. ओसाडीतल्या रानभेंड्यावर फिकट पिवळे, गाभ्यात जांभळे नाजुक पेले उभे राहतात. रानवेलींना पांढरी, जांभळी, पिवळी फुले येतात.

शेते पिकायला सुरुवात झाली म्हणजे हळवी आधी पिकतात. तेव्हा शेतजमिनीवर हिरवेपिवळे गालिचे पसरल्यासारखे दिसतात. भाते कापली गेली, की शेते उघडी पडतात. त्यांत मग दुसऱ्याच वनस्पती उगवतात आणि शेते पुन्हा हिरवी दिसू लागतात. त्यातच पुढे पिवळी, जांभळी, निळी, गुलाबी अशी छोटी छोटी सुंदर नक्षीची वेगवेगळ्या आकारांची फुले फुलतात आणि शेतांचा मळकटपणा झाकून टाकतात. ह्या फुलांचे आयुष्य संपते न संपते



तोच रुपेरी हिरव्या काटेरी झुडपांवर नितळ पिवळा धोतरा फुलू लागतो. चोहीकडचे गवत वाळून त्याच्या पिवळ्या चोयट्या झालेल्या असतात. शेतातली काळपट माती उघडी पडली आहे हे माहीत असले तरी ही फुले तिकडे लक्ष जाऊ देत नाहीत. दृष्टी वर करून डोंगरांकडे पाहावे तर त्यांची अंगे तांबूस पडलेली असतात, पण त्यांवरच मधूनमधून पळसांनी अंगभर भगवे शेले पांघरलेले असतात. सावरीवर लाल किरमिजी फुलांचे पेले उभे असतात. पांगाऱ्यावर शेंदरी फण्या फुललेल्या असतात. आंब्याची झाडे पिवळट पांढऱ्या मोहोराने झाकलेली असतात. त्यातून मध झिरपत असतो आणि त्याचा तिखट, जड, गोड गंध रानोमाळ दाटून राहतो आणि मधूनच आपण पुन्हा आलो असल्याची कोकीळ वर्दी देतात.



हळूहळू हवेत रुक्षता आणि उष्णता वाढू लागते. शेतांतून आणि डोंगरांच्या अंगांवरून भाजावळीच्या धुराचे लोट फिरू लागतात. तसे पिंपळ, सावर, साग, करंजा वगैरेंना नवी पोपटी पालवी फुटून ती ताजीतवानी दिसू लागतात. डोंगरावरच्या झाडाझुडपांनाही हिरवी टवटवी येते. गुलमोहोरावर तांबडा शिडकावा दिसू लागतो आणि बांबूच्या बेटांतून कोवळी पोपटी कारंजी उडू लागतात. अंगाची तलखी होत असते, पण डोळे निवत असतात.

उन्हाळा वाढतच असतो. पुन्हा ढगांची ये-जा होऊ लागते आणि मे महिन्यातल्या एखाद्या संध्याकाळी मागून येणाऱ्या पावसाची वर्दी द्यायला वळवाच्या सरी येतात. ऋतुचक्राचा एक फेरा पुरा होतो.

## शब्दार्थ व टिपा

**पागोळ्या** — इमारतीच्या पाख्यावरून ओघळणारे पावसाचे पाणी. **गेंद** — तुरे. **इंद्रनील** — एक रत्न. **भुभु:कार** — आरोळी. **हळवी** — लवकर पिकणारे एक धान्य. **सावरी** — एक प्रकारचे झाड. **भाजावळ** — बी पेरण्यापूर्वी जमीन भाजण्याची क्रिया. **तलखी** — काहिली, उन्हाने होणारी तगमग.

## स्वाध्याय

१. पाऊस पडून गेल्यावर निसर्गामध्ये कोणकोणता बदल घडून येतो?

२. पावसाळ्यात कोणकोणत्या पक्ष्यांचे आगमन होते?

३. हवेमध्ये उष्णता वाढल्यामुळे निसर्गात कोणता बदल झाला आहे?

४. ऋतुचक्राचा एक फेरा पूर्ण झाला, असे लेखक का म्हणतात?

५. मे महिन्यातील पावसाचे थोडक्यात वर्णन करा.

६. खालील कल्पना स्पष्ट करा.

आभाळ म्हशीच्या पोटासारखे काळे जांभळे होते व जडजड होत जाते.

७. 'पावसाळ्यातील एक दिवस' या विषयावर पंधरा ओळीत माहिती लिहा.

# २५. झपझप चाललेत नाजुक पाय!



मे महिन्याची दुपार ... रणरणते उन्ह
झगमगता सूर्य आभाळामधून
जाईफुलासारखी नाजुक पोर
घेऊन निघाली बापाला भाकर
गिरणीचा भोंगा आत्ता होईल
दमलेला बाप फाटकात येईल
उशीर झाला म्हणून रागवेल काय?
झपझप चाललेत नाजुक पाय!

घरचे सगळे तिनेच केले
आजारी आईला औषध दिले
धाकट्या भावाची घेतली शिकवणी
पाठच्या बहिणीची घातली वेणी
येईल तसा शिजवला भात
तापलेल्या तव्याने पोळले हात
तरीपण डोळ्यात पाणी नाही
आईचीच आज ती होती आई
डोळे भरून पाहत होती माय
झपझप चाललेत नाजुक पाय!

माथ्यावर उन्ह . . . पायाखाली उन्ह
परिस्थितीचे मनात उन्ह
निखाऱ्यात तापलेल्या धरणीमाये
पोरीचे पाऊल कमळाचे आहे
तिच्या पावलाखाली चंदन हो
माथ्यावरच्या सूर्या चंद्रमा हो
अरे, तिच्या डोळ्यांतली भीती पाहा
घड्याळा थोडेसे मागे राहा
बापासाठी लेक ओढीने जाय
झपझप चाललेत नाजुक पाय!



### शब्दार्थ व टिपा

**रणरणते** — कडकडीत. **झगमगता** — लखलखीत, झगझगीत.

### स्वाध्याय

१. मुलीची पावले झपझप का पडत आहेत?
२. मुलीच्या मनात कोणते विचार घोळत आहेत?
३. आईचीच आज ती आई झाली आहे,असे कवी का म्हणतो?
४. घड्याळाला थोडे मागे राहण्यासाठी कवी का सांगत आहे?
५. ही कविता वाचून मुलीचे वडील, तिची आई व घरची स्थिती यांबाबत तुमच्या नजरेसमोर येणारे दृश्य दहा ते बारा ओळींत लिहा.
६. 'मे महिन्यातील एक रखरखीत दुपार' यावर एक परिच्छेद लिहा.

# २६. कन्याकुमारी

ज्या आपल्या मायदेशावर आपण प्रेम करतो, त्याचे रूप कसे आहे आणि आपले देशबांधव राहतात कसे, ते पाहण्याच्या उत्कट इच्छेने स्वामी विवेकानंद कलकत्त्याहून बाहेर पडले. बरोबर पैसाअडका न घेता, अंगात फक्त भगवी कफनी घालून स्वामीजी सर्व हिंदुस्थानभर पायीपायीच हिंडले. त्यांनी जंगले पाहिली. नद्या, सरोवरे पाहिली. पशुपक्षी पाहिले. लहान-थोर माणसे पाहिली. त्यांची श्रीमंती आणि गरिबी पाहिली. प्रवास करता करता तीस वर्षांचा तो शूर संन्यासी भरतखंडाच्या दक्षिणेकडच्या अगदी शेवटच्या टोकावरल्या गावात हजर झाला. त्या वेळी संध्याकाळ झालेली होती. गावाचे नाव होते कन्याकुमारी. कन्याकुमारी गाव हा भारतभूमीचा अखेरचा जमिनीचा तुकडा आहे. कन्याकुमारी गावाच्या पलीकडे भारताची जमीन नाही. तिथून पुढे फक्त हिंदमहासागराचे निळे पाणी आहे. वर निळेभोर आभाळ, खाली निळाशार समुद्र आणि मधल्या पोकळीत चंद्रसूर्याच्या रेशमी किरणांचा खेळ.

कन्याकुमारी गावात आल्यावर स्वामीजी थेट देवीच्या दर्शनाला मंदिरात गेले. तिथे समयांची आणि दिव्यांची सजावट केलेली होती. फुलांची आरास मांडलेली होती. देवीच्या अंगावर रत्नांचे हार झगमगत होते. देवीचे रूप तेजःपुंज होते. तिला पाहताच विवेकानंदांना संतोष झाला. त्यांनी देवीला दंडवत घातला.

दर्शन आटोपून स्वामीजी मंदिराला अगदी लागूनच असलेल्या सागरकिनाऱ्यावर आले. तिथे त्यांना समुद्रात दूर अंतरावर एक काळाकुळकुळीत प्रचंड खडक दिसला. खडकावर काहीही नव्हते. फक्त काळा दगड. जणू काही त्या फेसाळणाऱ्या दर्यात एक राक्षसी कासवच पोहत

होते. साहजिकच त्या खडकावर जाऊन तो पाहण्याची स्वामींना प्रबळ इच्छा झाली. परंतु स्वामीजींपाशी पैसे नव्हते. त्यामुळे नावाडी लोकांनी त्यांना होडीतून खडकापर्यंत नेण्याचे साफ नाकारले. विवेकानंद डगमगले नाहीत. त्यांनी समुद्रात उडी मारली आणि पोहत पोहत खडकावर गेले. ते तिथे ध्यानाला बसले. आजूबाजूला कोणी नाही. सभोवताली खवळलेला समुद्र आणि खडकावर चिंतन करत शांतपणे बसलेले विवेकानंद, असा तो सुंदर देखावा होता. सतत तीन रात्री आणि दोन दिवस स्वामीजींनी खडकावर ध्यान केले.



त्यानंतर स्वामीजींच्या आयुष्याला वेगळे वळण लागले. स्वामीजींनी सांगितले आहे, 'मला कोणती कामगिरी बजावायची आहे, हे अखेर मला कळून आले. भारताच्या आणि जगाच्या कल्याणाकरता आणि धर्माच्या सत्य ज्ञानाच्या प्रसाराकरता मला हा महासागर ओलांडून पलीकडेच गेले पाहिजे, हे मला जाणवले. एक योजना माझ्या मनात स्फुरण पावली.'

ध्यान संपवून स्वामीजी किनाऱ्यावर परत आले. भारतात आणखी थोडे फिरले आणि नंतर धर्माच्या प्रसारासाठी पुढे अमेरिकेला गेले. विवेकानंदांनी अमेरिकेत हिंदू धर्मावर शेकडो भाषणे दिली आणि भारताचे नाव जगात



उंचावले. भारतीय अध्यात्म आणि तत्त्वज्ञान यांची माहिती भारताबाहेरच्या अफाट जगाला झाली.

अशा प्रकारे स्वामीजींना नव्या कार्याची स्फूर्ती देणारा भूभाग म्हणून कन्याकुमारी गावाची मोठी ख्याती आहे. ह्याच गावाला 'केप कोमोरीन' असेही म्हणतात. 'केप' म्हणजे सागरात घुसलेला जमिनीचा तुकडा. 'कोमोरीन' म्हणजे 'कुमारी'.

कन्याकुमारी गाव लहान आहे. पण यात्रिकांची तिथे वर्षभर गर्दी उसळलेली असते. कारण भारतभूमीचे ते दक्षिणेकडचे अंतिम टोक आहे. पूर्वेला बंगालचा उपसागर आहे. त्या सागरातून रोज सकाळी सूर्य उगवताना दिसतो. दक्षिणेला हिंदी महासागर आहे आणि पश्चिमेला अरबी समुद्र आहे. त्या सागरात रोज संध्याकाळी सूर्य मावळताना दिसतो. कन्याकुमारी हे सर्व भारतात एकच असे गाव आहे, की जिथून सागरात होणारा सूर्योदय आणि सूर्यास्त, दोन्ही दिसू शकतात. सूर्योदयाची आणि चंद्रोदयाची शोभा पाहण्यासाठी सर्व भारतातले आणि भारताबाहेरचेही प्रवासी कन्याकुमारीला येतात. तीन सागरांचा संगम इथे झालेला असल्यामुळे कन्याकुमारी हे एक तीर्थस्थान बनले आहे. महात्माजींच्या अस्थींचे विसर्जनही ह्या सागर-संगमात करण्यात आले होते. म्हणून कन्याकुमारीच्या सागरकिनाऱ्यावर महात्माजींचेही स्मारक बांधलेले आहे.

कन्याकुमारी सागरातल्या ज्या खडकावर स्वामी विवेकानंदांनी ध्यान केले, त्या खडकावर आता एक अतिशय देखणे आणि भव्य असे विवेकानंद स्मारक मंदिर बांधण्यात आले आहे. त्या स्मारकात स्वामीजींचा उंच उभा पुतळा आहे. ध्यानासाठी गुहेसारखी शांत खोली आहे. मोठा सभामंडप आहे. ह्या खडकावरल्या विवेकानंद-स्मारकातून सृष्टिसौंदर्य फारच मोहक दिसते. पाहावे तिकडे सागराचे निळे पाणी आणि पलीकडे भारताची नारळीच्या बागांनी झाकलेली सदासुंदर भूमी.

कन्याकुमारी गावं नकाशावर फार दूर दिसते. प्रत्यक्षात मात्र ते तीर्थस्थान तसे फार जवळ आलेले आहे. कारण आगगाडीचा फाटा आता थेट कन्याकुमारीपर्यंत काढण्यात आला आहे. एस.टी.च्या बसगाड्या आणि मोटारी तर आता मंदिराच्या जणू अंगणातच उभ्या राहतात. 'विवेकानंद केंद्र' ह्या परोपकारी सामाजिक संस्थेने आता प्रवाशांच्या राहण्याखाण्याची स्वच्छ आणि स्वस्त सोयही केली आहे. त्या विभागाला 'विवेकानंदपुरम्' म्हणतात. शिवाय पर्यटकांसाठी निवासस्थान, उपाहारगृहे, धर्मशाळा, वसतिगृहे वगैरे अनेक सोई झाल्या आहेत. कन्याकुमारी गाव आता चांगलेच भरभराटीला आले आहे. गावात सर्व जाती-धर्मांचे लोक सुखाने राहतात.

हे गाव तामिळनाडू राज्यात आहे.

इतका महान इतिहास, इतका सुंदर निसर्ग आणि इतक्या आधुनिक सुखसोई ज्या कन्याकुमारी गावाला लाभल्या आहेत, तो पवित्र गाव भारतवासीयांनी एकदा तरी पाहिलाच पाहिजे.

### शब्दार्थ व टिपा

**कफनी** — साधूचा लांब अंगरखा. **तेजःपुंज** — तेजस्वी. **स्फुरण पावणे** — स्फूर्ती येणे. **पर्यटक** — प्रवासी.

### स्वाध्याय

१. स्वामीजी कोणत्या उत्कट इच्छेने कलकत्त्याहून बाहेर पडले?

२. स्वामीजी अमेरिकेला कशासाठी गेले? तेथे जाऊन त्यांनी काय केले?

३. जगभरच्या प्रवाशांना कन्याकुमारीचे आकर्षण का वाटते?

४. कन्याकुमारीला कोणकोणत्या गोष्टींमुळे विशेष महत्त्व प्राप्त झाले आहे?

५. पवनार येथील विनोबा भावे यांच्या आश्रमाची माहिती गुरुजींकडून मिळवा.

६. 'निळेभोर आभाळ', 'निळाशार समुद्र' असे शब्द पाठात आले आहेत. त्याप्रमाणे खालील नामांच्या पूर्वी रिकाम्या जागी योग्य विशेषणे लिहा.

.... रान, ..... पाऊस, ....... वारा, ...... पोळी ...... पाणी.

७. तुम्ही पाहिलेल्या एखादया 'सुंदर स्थळाची' माहिती दहा वाक्यांत लिहा.

# २७. जबाबदारी

नागरिकांच्या जीवनात कोणकोणत्या गोष्टींना महत्त्व असते, याचा विचार केला तर भिन्न भिन्न वृत्तींचे लोक भिन्न भिन्न गुणांवर, गोष्टींवर जोर देतील. काहीजण चांगल्या रीतीरिवाजांवर जोर देतील, तर काही शिष्टाचार, चांगली चालचलणूक, सभ्यता यांना नागरी जीवनात महत्त्वाचे स्थान आहे असे म्हणतील. भारतातील अनेक भागांतून आलेले वेगवेगळे लोक शहरात एकत्र राहतात. तिथे तर या गोष्टींना अधिकच महत्त्व असते. सामुदायिक जीवनात, सामाजिक व्यवहारात सभ्य चालचलणुकीस कमी लेखून चालणंार नाही. गाडीच्या चाकाला जसे तेलाचे ओंगण, त्याप्रमाणे समाजाच्या गाड्याला सभ्य चालचलणुकीचे, गोंड शिष्टाचाराचे ओंगण आवश्यक असते. अशानेच गाडी नीट चालेल. नाहीतर खटखटी व कुरकुरी सुरू होतील.

बरे बोलावयास, बरे चालावयास, बरे बघावयास, बरे हसावयास कोणाचे काही खर्च होते असे थोडेच आहे? परंतु ह्या गोष्टी दिसावयास जरी क्षुद्र असल्या, तरी त्यांचे परिणाम फार चांगले होतात. वाणी गोड असणे ही गोष्ट फार जरुरीची आहे. गोड जिभेने जगमित्र होता येते. यांच्या पाठीमागे सुकुमार व कोमल अशा सामाजिक भावनाही जर असतील, तर तीच सभ्यता, दंभ न राहता सत्यरूप होईल. अशी ही हार्दिक सभ्यता, देखल्या देवा दंडवत नव्हे, तर ती मानव जातीला मिळालेली बहुमोल देणगी होय. आपण बाहेर वागतानाच सभ्यता पाळावी असे नाही, तर घरातसुद्‌धा ती पाळावी. आपली आई, आपले भाऊ, आपल्या बहिणी, आपली पत्नी ही आपली झाली म्हणून काय झाले? त्यांच्याशी का आदराने वागावयास नको? मर्यादेने वागावयास नको? मी लोकांशी बाहेर चांगले वागावे आणि माझ्याच घरातील माझ्या जवळच्या प्रिय माणसांशी पशूसारखे वर्तन करावे, त्यांच्याशी तुसडेपणाने, तिरस्काराने वागावे, हे बरे आहे का? हे भले दिसते का? जे

माझ्या ओळखीचेही नाहीत, ज्यांचे माझे ना सोयरसुतक त्यांच्याजवळ मात्र मी सुष्टात्मा आणि घरात मात्र मी दुष्टात्मा बनावे का? बाहेरच्यांजवळ साळसूद व घरात मात्र भूत असे वागावे का?

दुसरे काही लोक वक्तशीरपणा, व्यवस्थितपणा, नियमितपणा या गुणांवर जोर देतील. सार्वजनिक जीवनात वक्तशीरपणा व व्यवस्थितपणा हे गुण अत्यंत आवश्यक आहेत. ते जर नसतील तर फार गोंधळ होतो व अनेकांच्या गैरसोई होतात. खरोखर नियमितपणा हा आपला धर्म झाला पाहिजे. सूर्य, चंद्र ठरल्या वेळी येतात, ऋतू ठरल्या वेळी येतात. नियमितपणाचा अभाव म्हणजे संयमाचा अभाव होय व संयमाचा अभाव म्हणजे सामर्थ्याचा नाश होय. दुसऱ्यांची गैरसोय होऊ नये म्हणून आपण आपला आळस वा इतर सुख दूर ठेवून नियमित व वक्तशीर झालेच पाहिजे.



दुसऱ्याजवळ वागताना सदैव विश्वासार्ह राहिले पाहिजे. दुसऱ्याने आपणांवर बिनधोकपणे विसंबावे अशी आपली पत व दानत हवी. नाहीतर सांगावे एखाद्याला, की टाकतो तुमचे पत्र पेटीत व ते पत्र आपल्या कोटाच्या खिशातच महिना महिना पडून राहावे. आठ वाजता येतो म्हणून सांगावे व दहा वाजले तरी पत्ता नसावा. या महिनाअखेर पगार.होताच पैसे देतो म्हणून कबूल करावे; परंतु पगार होऊन तो खलास होण्याची वेळ आली तरी देण्याची आठवण मात्र होऊ नये. पुस्तक आठ दिवसांनी परत करतो म्हणून सांगावे, परंतु महिना महिना घरी ठेवून शेवटी ते आपणच जुन्या बाजारात नेऊन विकावे. आपणांस या गोष्टी लहान व क्षुद्र वाटतात. परंतु या बारीकसारीक गोष्टींनीच राष्ट्रीय चारित्र्य बनत असते. जो बारीकसारीक व्यवहारात विश्वासार्ह नाही तो मोठ्या व्यवहारात तरी कसा राहील? विश्वासभंगासारखे पाप नाही, वचनभंगासारखा दोष नाही. ह्या भरतभूमीत वचन पाळण्याचे महत्त्व सांगण्याची जरुरी पडावी का? हरिश्चंद्र व रामचंद्र यांच्या या भूमीत विश्वासार्ह बना, असे उपदेशिण्याची पाळी यावी का?

आपणांवर सोपवलेली जबाबदारी पार पाडणे म्हणजे देवाच्या परीक्षेत उत्तीर्ण होणे होय. ज्या वेळेस आपणांवर काही जबाबदारी सोपवण्यात येते, काही विश्वास टाकण्यात येतो, त्या वेळेस परमेश्वर परीक्षा घेत आहे असे समजावे. जे काम आपणांवर सोपवण्यात आले, ते पार पाडण्यासाठी आपण आपली शिकस्त केली पाहिजे. तुकारामांनी म्हटले आहे, 'विश्वासाची धन्य जाती.' आपल्यावर सारे विश्वास ठेवतात, याहून भाग्याची व कृतकृत्यतेची दुसरी गोष्ट कोणती?

नागरिकत्वाची किंवा इतर राष्ट्रीय कर्तव्ये करत असताना आपण आपल्या वैयक्तिक भावना, घरची सुखदुःखे, वैयक्तिक तंटे हे सारे घरीच ठेवून बाहेर पडले पाहिजे. सार्वजनिक कर्माची जबाबदारी मजवर असताना मी माझा क्षुद्र 'अहं' त्या वेळेस विसरून गेले पाहिजे. माझ्या सार्वजनिक कर्तव्यक्षेत्रात, ही घरातील स्वार्थ-मत्सराची भुते येता कामा नयेत. सार्वजनिक जबाबदारी

शिरावर असताना स्वतःचा स्वार्थच काय तर स्वतःचे आरोग्यही क्षणभर दूर ठेवले पाहिजे. मॅझिनी म्हणत असे, 'माझ्या राष्ट्राला माझी जरुरी असताना मी आजारी कसा पडू शकेन!' न्यायमूर्ती रानड्यांना त्यांची प्रकृती बरीच बिघडल्यामुळे डॉक्टर लाहोरच्या सामाजिक परिषदेस जाऊ देत ना, त्या वेळेस त्या ऋषितुल्य माणसाच्या डोळ्यांतून घळघळ पाणी आले.

माझ्यावर ही जबाबदारी आहे, ह्या विचाराने आपणांस पराकाष्ठेचे प्रयत्न करण्यास सामर्थ्य आले पाहिजे; पराकाष्ठेचा त्याग करावयास स्फूर्ती आली पाहिजे. 'माझी जबाबदारी पार पडली, आता मी सुखाने मरतो,' असे बाजीप्रभू म्हणाले. 'माझे डोके तरी किल्ल्यात जाऊन पडू दे, नाहीतर किल्ला हातात पडू दे,' असे भीष्मप्रतिज्ञ चिमाजी आप्पा बोलले. 'आधी लगीन कोंडाण्याचे, मग माझ्या रायबाचे,' असे जबाबदारी ओळखणारा परमवीर तानाजी म्हणाला. जबाबदारी पार पाडणे, विश्वासाला पात्र होणे फार भव्य व दिव्य आहे. तुम्ही पडलेत तरी चालेल, परंतु जबाबदारी पार पाडा.

## शब्दार्थ व टिपा

**ओंगण** — वंगण. **दंभ** — ढोंग. **देखल्या देवा दंडवत** — तोंडापुरता आदर. **साळसूद** — सरळमार्गी. **दानत** — उदारपणा. **शिकस्त** — पराकाष्ठा. **सोयरसुतक नसणे** — सुखःदुख नसणे. **जोसेफ मॅझिनी** — इटालीच्या स्वातंत्र्य युद्धातील सशस्त्र क्रांतिकारक.

## स्वाध्याय

१. समाजाच्या गाड्याला कोणते वंगण आवश्यक असते?

२. वाणी गोड असणे महत्त्वाचे का आहे?

३. तुमची सभ्यता ढोंग वाटण्याची शक्यता केव्हा निर्माण होईल?

४. नियमितपणा हा आपला धर्म झाला पाहिजे,असे लेखिकेला का वाटते?

५. बारीकसारीक गोष्टींनीच राष्ट्रीय चारित्र्य बनते हे सांगताना पाठात कोणती उदाहरणे दिलेली आहेत?

६. राष्ट्रीय कर्तव्य करत असताना कोणती दक्षता घेण्याचे लेखिका सांगते?

७. स्वार्थ दूर सारून राष्ट्रीय कर्तव्य बजावलेल्या कोणत्या महापुरुषांची उदाहरणे या पाठात आलेली आहेत?

८. विरुद्धार्थी शब्द लिहा.
सभ्यता, दुष्टात्मा, व्यवस्थित, संयमी.

९. आयुष्यातील वक्तशीरपणाचे फायदे लिहून तुमच्या संदर्भातील अशा एखाद्या प्रसंगाचे थोडक्यात वर्णन करा.

१०. जीवनाला मार्गदर्शक ठरतील असे काही अभंग व सुभाषिते वहीत लिहा.

---

## व्याकरण

- ज्या अक्षरांचा उच्चार करताना नाकाचे साहाय्य घ्यावेच लागते त्या अक्षरांवर **अनुस्वार** द्यावा.
  उदा. अंगण, चिंच, आंबा, गंध, भिंत.
- नामाच्या व सर्वनामाच्या अनेकवचनी रूपांत, त्यांची जी सामान्यरूपे असतात त्यांवर अनुस्वार द्यावेत.

| | |
|---|---|
| विद्वान (एकवचन) | विद्वानांना (अनेकवचन) |
| तो (एकवचन) | त्यांना (अनेकवचन) |

**विद्वान** शब्दाचे **विद्वाना** हे **सामान्यरूप** आहे. शब्दांना विभक्ती प्रत्यय लावण्यापूर्वी त्या शब्दात जो विकार (बदल) होतो व तो सर्व प्रत्यय लागताना सातत्याने राहतो त्याला त्या शब्दाचे **सामान्यरूप** म्हणतात. तसेच **तो** या सर्वनामाचे **त्या** हे सामान्यरूप होय. त्याचा, त्याने, त्याला, त्यातून अशी विविध रूपे पाहा. त्यांत **त्या** हे सामान्यरूप दिसेल.

खालील शब्दांतील सामान्यरूप ओळखा.

(१) हे जगणं जनावराचं आहे.

(२) जिल्ह्यातल्या अनेक शाळांतून कार्यक्रम केले.

---

# २८. नवरोज

नवरोज हा पारशी लोकांचा एक महत्त्वाचा सण आहे. तो मोठ्या आनंदाने साजरा करतात. भारतामध्ये ज्या अल्पसंख्याक जमाती आहेत, त्यांमध्ये पारशी ही एक जमात आहे. सुमारे १२०० वर्षांपूर्वी पर्शिया सोडून पारशी लोक भारतात आले. कारण तेथे त्यांचा धार्मिक छळ होत होता आणि ते निराधार झालेले होते. भारतात त्यांना आधार आणि सुरक्षितता वाटली. मुंबईच्या आसपास आणि गुजरातच्या काही भागांत त्यांनी वस्ती केली. त्यांचा स्वतःचा 'जरथुश्त्री' हा धर्म असला तरी भारतातील विविध धर्मांतील काही चालीरीती त्यांनी आपल्याशा केल्या आहेत.

२१ मार्च या दिवशी 'नवरोज' हा सण दरवर्षी साजरा केला जातो. तो पारशी बांधवांतील काहींचा नववर्ष दिन समजला जातो. तो उत्सव साजरा करताना सगळेच पारशी बांधव त्यात सामील होतात, हा भाग वेगळा. ह्या दिवशी सगळेच पारशी बांधव अतिशय आनंदात असतात. परस्परांना भेटायला जातात. अग्यारी हे त्यांचे प्रार्थनास्थळ, तिथे ते एकत्र जमतात. सगळीकडे अतिशय उत्साहदायक वातावरण असते. आणि त्यामुळे पारशी लोकांनाच नव्हे तर भारतातीलही बहुतांश लोकांना त्या दिवसाचे एक वेगळे आकर्षण असते.

ह्याच ऋतूत अशोकाला बहर येतो आणि आम्रमंजिऱ्या आपल्या सुगंधाने सारे वातावरण दरवळून टाकतात. सगळीकडे कशी नवी पालवी फुटलेली असते. सर्व निसर्गाला नवजीवनच प्राप्त झालेले असते. मग माणसे तरी का मागे राहतील. तीही नवजीवन प्राप्त झाल्याप्रमाणेच आनंदात हे क्षण घालवत असतात.

हा सगळा आनंद पारशी लोक त्यांच्या प्रदेशात होते तेव्हाही करत असत. इसवी सनाच्या ६ व्या शतकापूर्वी त्यांच्या जमातीतील सायरस आणि दारियस

नावाचे राजे राज्य करत असताना ह्या सणाला आगळे महत्त्व प्राप्त झालेले होते. त्याच्याही पूर्वी जमशेद नावाचा राजा तर ह्या दिवसाला खूपच महत्त्व देऊन आनंदोत्सव करत असे. वसंताचे हे आगमन अशा आनंदोत्सवाने करण्याचा मान या जमशेद राजाला दिला जातो. आणि म्हणूनच ह्या सणाला 'जमशेदी नवरोज' असे म्हटले जाते.

आबालवृद्ध या सणामध्ये रंगून, गुंगून गेलेले असतात. घरातील जाळी-जळमटे काढून टाकून घर स्वच्छ करण्याची अहमहमिका लागलेली असते. घरांना रंग दिला जातो. काही तूटफूट झाली असेल तर ती लगेच दुरुस्त केली जाते. घर नवेनवे दिसावे यासाठी प्रत्येकाची धडपड चालू असते. माणसांनादेखील नवा हुरूप येतो आणि आपणही अगदी नवेनवे दिसावे असे त्यांना वाटू लागते. मग ते नवेनवे कपडे शिवतात. स्त्रिया कलाबतूची कामे केलेल्या रेशमी साड्या परिधान करतात. मुलांच्याकरता उंची पोशाख शिवला जातो. गुलाबाच्या माळा आणि सुगंधी फुलांची पखरण घरभर केली जाते आणि सर्वत्र सुगंधाचे साम्राज्य पसरते.

नवरोजच्या दिवशी अभ्यंगस्नान करतात. अंगणात ठसे उमटवून रांगोळ्या काढतात. त्यांत विविध रंग भरतात. त्यामुळे त्या खुलून दिसतात. येणाऱ्या-जाणाऱ्यांचे लक्ष वेधून घेतात. दारे, भिंती फुलांच्या रंगीत माळांनी सजवतात. त्यामुळे सगळे वातावरण आल्हाददायक होते.

पारशी लोकांच्या सणातही पक्वान्नांची चंगळ असते. गव्हाच्या सोजीचा दूध आणि साखर घालून चवदार शिरा करतात. त्याला ते 'रवा' असे म्हणतात. त्या रव्यावर ते गुलाबपाणी शिंपडतात. अक्रोड, काजू, बदाम, पिस्ते यांच्या किसाची त्यावर पखरण करतात. मग त्यांची ताटे भरून त्यावर रुमाल झाकला जातो आणि ती इतर कुटुंबांना सप्रेम भेट देतात.

अग्यारीमध्ये त्या दिवशी 'जशन' साजरा केला जातो. म्हणजेच परस्परांबद्दल कृतज्ञता व्यक्त करण्यासाठी प्रार्थना केली जाते. नंतर सगळे

पारशी बांधव परस्परांना अत्यंत प्रेमाने भेटतात आणि नववर्ष सुखाचे जावो अशा शुभकामना व्यक्त करतात.

या दिवशी इतर धर्मांतील त्यांचे मित्रही त्यांच्याकडे येतात, त्यांना शुभेच्छा देतात. पारशी बांधव त्या शुभेच्छांचा साभार स्वीकार करतात व घरी आलेल्यांचे तोंड गोड करतात. आलेल्यांच्या अंगावर गुलाबपाणी शिंपडले जाते. पारशी बांधव आपल्या काही गरीब कुटुंबांना हा सण तशाच उत्साहाने साजरा करता यावा म्हणून त्या कुटुंबीयांकडे मिठाई, नवे कपडे आणि इतर भेटवस्तू पाठवतात. मुलांनाही या कार्यात सामील करून घेतले जाते. यातून अप्रत्यक्षरीत्या आपल्या आनंदात दुसऱ्यालाही सहभागी करून घेण्याचे महत्त्व मुलांच्या मनावर बिंबवले जाते.



आपल्याकडील काही सणांच्या वेळी निरनिराळ्या धान्यांची हिरवी-हिरवी रोपे उगवायची पद्धती आहे. तशीच ती नवरोजच्या सणातही आहे. मातीच्या भांड्यात गव्हाची रोपे उगवतात आणि ती सहा-सात इंच वाढवतात. त्यांची छाटणी करून रोपांची उंची सारखी ठेवतात.

अशा रोपांची पाने घरात सर्वत्र टेबलावर, खिडक्यांवर, कपाटावर ठेवतात. घरातील प्रत्येक सदस्यासाठी एक असे हे पान, नवीन जीवन व वृद्धी यांचे प्रतीक म्हणून ठेवले जाते. शेवटी सर्व लोक आपापल्या घरातून ही रोपांची पाने नदीच्या पात्रात अर्पण करतात. निर्मळ जल आणि हरित सृष्टी यांकरता आदर, सन्मान व्यक्त करण्याचा हा प्रतीकात्मक प्रघात आहे. नंतर नदीकिनारी जमून सर्वजण सहभोजनाचा आनंद लुटतात.

या विशाल भारतात असे अनेक धर्मीय आपापले सण आणि उत्सव साजरे करताना, कळत नकळत इतरांच्या काही चालीरीती आपल्यांत सामावून घेतात. आणि मग अनेकतेत एकता साधली जाते; परस्परांत सौहार्दाचे वातावरण निर्माण होते.

## शब्दार्थ व टिपा

**नवरोज** — पारशी लोकांचा सण. **पर्शिया** — एक प्राचीन देश. **शुभकामना** — शुभेच्छा. **सौहार्द** — स्नेह. **जशन** — उत्सव, समारंभ. **आम्रमंजिऱ्या** — आंब्याचा मोहर. **अहमहमिका** — चढाओढ **कलाबतू** — चांदीची किंवा सोन्याची तार, रेशमी दोरा.

## स्वाध्याय

१. पारशी बांधव भारतात येण्याचे कारण सांगा.
२. नवरोज हा सण २१ मार्चला का साजरा करतात?
३. नवरोज या सणाच्या वेळी वातावरणात कोणता बदल झालेला असतो?
४. पारशी बांधव नवरोज हा सण कशा प्रकारे साजरा करतात?
५. गव्हाची रोपे उगवून ती वाहत्या पाण्यात सोडण्यामागे हेतू कोणता?

६. एका वाक्यात उत्तरे सांगा.

१. पारशी बांधव किती वर्षांपूर्वी भारतात आले?

२. पारशी बांधवांचा धर्म कोणता?

३. नवरोज या सणाचे दुसरे नाव कोणते?

४. या सणाच्या निमित्ताने मुलांवर कोणता संस्कार केला जातो?

५. पारशी मुलींची रांगोळी काढण्याची पद्धत कोणती?

७. खाली धर्म आणि त्या धर्माचे लोक मानत असलेल्या नववर्षदिनाचे उल्लेख आहेत. त्यांच्या योग्य जोड्या लावा.

| धर्म | नववर्ष दिन |
|---|---|
| हिंदू | नवरोज, २१ मार्च |
| पारशी | चैत्रशुद्ध प्रतिपदा, गुढीपाडवा |
| मुस्लीम | १ जानेवारी |
| ख्रिश्चन | मोहर्रम प्रथमदिन |

८. खालील धर्मीयांच्या प्रार्थनास्थळांची नावे लिहा

हिंदू, पारशी, ख्रिश्चन, शीख, मुसलमान, बौद्ध.



# २९. हुतात्मा भाई कोतवाल

हुतात्मा भाई कोतवाल यांचे संपूर्ण नाव विठ्ठल लक्ष्मण कोतवाल असे होते. त्यांचा जन्म १ डिसेंबर,१९१२ रोजी माथेरानला झाला. त्यांनी कुलाबा जिल्ह्यात माणगाव येथे तहसील कचेरीत काही दिवस नोकरी केली. लोक त्यांना अण्णासाहेब या नावाने संबोधत.

लहानपणी अण्णासाहेब शाळेमध्ये एक हुशार विद्यार्थी म्हणून चांगलेच गाजले. ते विद्यार्थिमित्रांचे अतिशय आवडते झाले. वर्गात शिक्षकांनी दिलेली गणितातील उदाहरणे ते चटकन सोडवत. अण्णांचे शिक्षक गणिते शिकवत; पण ती पद्धत मुलांना कधी कधी समजत नसे. अण्णा अशी गणिते अत्यंत सोप्या पद्धतीने सोडवत व ती मुलांनाही समजावून सांगत. त्यांनी केलेली ती गणिते शिक्षकांच्या रीतीपेक्षा सोपी असल्यामुळे विद्यार्थ्यांच्या चटकन ध्यानात येत. एकदा वर्गात अण्णासाहेबांनी गणित वेगळ्या प्रकारे सोडवले म्हणून शिक्षकांनी ते चूक दिले. पण अण्णांनी ती चूक, चूक नव्हे असे शिक्षकांना निर्भयपणे सांगितले आणि आपली रीत कशी बरोबर आहे ते दाखवून दिले. शिक्षकांना अण्णासाहेबांची ही हुशारी पाहून कौतुक वाटले.

अण्णासाहेब पुढच्या शिक्षणासाठी पुण्याला गेले, त्या वेळी स्वातंत्र्याच्या चळवळीने जोर धरला होता. गांधीजी अहिंसेच्या, सत्याग्रहाच्या व असहकाराच्या मार्गाने इंग्रजांना नमवण्याचा प्रयत्न करत होते, तर क्रांतिकारकांचा मार्ग सर्वत्र दहशत निर्माण करण्याचा होता. दोघेही इंग्रजांना भारतातून हाकलून लावण्याचे मनसुबे करत होते. अण्णासाहेबांना क्रांतिकारकांचा मार्ग अधिक आवडला. आपल्या मातृभूमीसाठी आपणही आपले योगदान दिले पाहिजे असे त्यांनी ठरवले. त्यातच भगतसिंग, राजगुरू

आणि सुखदेव या देशभक्तांना ब्रिटिशांनी फाशी दिले. ही बातमी सर्वत्र पसरली. ती ऐकून तर अण्णासाहेब रागाने लालबुंद झाले. पण त्या वेळी त्यांचे शिक्षण चालू होते. त्यामुळे मनात सारखी खळबळ चालू असूनही त्यांना प्रत्यक्ष स्वातंत्र्यलढ्यात उतरता येईना. पण १९४२ साली मात्र वेगळाच इतिहास घडला. गांधीजींनी इंग्रजांना 'चले जाव' म्हणून बजावले आणि इंग्रजी सत्तेविरुद्ध रणशिंग फुंकले. आता अण्णासाहेबांनी ह्या स्वातंत्र्य-संग्रामात उडी घेतली.



ब्रिटिश सत्तेविरुद्ध आपल्या शक्तीनुसार लढायचे असे त्यांनी मनाशी ठरवले. ब्रिटिशांचे शासन पांगळे करायचे आणि सर्वत्र धुमाकूळ घालायची योजना त्यांनी आखली. इंग्रजांना जेरीला आणायचे म्हणून त्यांनी आपले अनेक मित्र एकत्र केले. भिवापुरी, खोपोलीमधल्या टेलिफोनच्या तारा त्यांनी

तोडल्या. गोळवाडीच्या पोलीसस्टेशनवर हल्ला केला व त्याला आग लावली. कामशेतजवळ कोणीतरी विजेचा मोठा स्तंभ पाडल्याची बातमी अण्णांच्या कानावर आली. तो स्तंभ पडल्यामुळे वीजप्रवाह अचानक खंडित झाला व सर्वत्र अंधाराचे साम्राज्य पसरले. ब्रिटिशांच्या राज्यात गोंधळ माजवायला हा एक उत्तम मार्ग आहे असे अण्णांच्या लक्षात आले आणि २५ सप्टेंबर,१९४२ ला त्यांनी असे विजेचे स्तंभ पाडण्याचा सपाटा लावला. याचबरोबर रेल्वेचे रूळ उखडणे, पूल पाडणे याही गोष्टी अधूनमधून त्यांनी सुरू केल्या. जुम्मा स्टेशनात दारूगोळ्याचा साठा आहे हे कळताच अण्णा आपल्या मित्रांना घेऊन तेथे थडकले. तो दारूगोळा त्यांनी हस्तगत केला आणि रूळ व पूल उडवण्याचे आपले कार्य आणखी सोपे केले.

आता ब्रिटिश सरकार चिडले. अण्णा कोतवालांना गावचे लोक मदत करतात म्हणून इंग्रजांनी गावकऱ्यांना वेठीला धरले. गावकऱ्यांना चाबकाच्या फटक्यांनी झोडपून काढले. अण्णासाहेबांना गावकऱ्यांवर होणारा जुलूम सहन होईना. त्यांनी आता बंदुका गोळा केल्या. आपल्या माणसांना त्या दिल्या आणि गावकऱ्यांना छळायला येणाऱ्या शिपायांना वाटेतच अडवून त्यांच्यावर बंदुका रोखल्या. मग सरकारने तिकडे फौज पाठवली. फौजेसमोर थोड्या मित्रांसह लढायला उभे ठाकलेल्या अण्णांचा टिकाव कसा लागणार? तरी पण हिमतीने ते त्यांच्यावर तुटून पडले. जबरदस्त धुमाकूळ माजला आणि त्यातच ब्रिटिश शिपायाची एक गोळी अण्णांच्या मांडीतून आरपार गेली,तरीही त्यांनी हिंमत सोडली नाही. कुठल्यातरी आडोशाला जाऊन जखम बांधावी व पुन्हा लढायला यावे म्हणून ते सिद्धगडाच्या दिशेने डोंगर चढायला लागले; पण ते हॉल नावाच्या गोऱ्या साहेबाने पाहिले आणि तो अण्णांच्या मागे धावला. तो गोरा साहेब सारखा बंदुकीने गोळ्या झाडत अण्णांचे पाय जायबंदी करत होता. अखेरीस अण्णा गोऱ्याच्या हाती लागले. त्या दुष्ट गोऱ्या साहेबाने असहाय अण्णांच्या डोक्याला बंदुकीची नळी लावली आणि आसुरी आनंदाने बंदुकीचा चाप ओढला. अण्णांचा देह क्षणात

कोसळला. भारतमातेच्या पवित्र मातीने तो देह पुनीत झाला. हा माथेरानचा वाघ कायमचा शांत झाला.

## शब्दार्थ व टिपा

**दहशत** — भीती. **योगदान** — सहयोग, सहकार्य. **जायबंदी** — जखमी. **पुनीत** — पवित्र. **हस्तगत करणे** — मिळवणे. **वेठीला धरणे** — जबरदस्तीने काम करून घेणे.

## स्वाध्याय

१. शिक्षकांना अण्णांचे कौतुक का वाटले?
२. अण्णासाहेब रागाने लालबुंद केव्हा झाले?
३. इंग्रजांना सतावण्यासाठी स्वातंत्र्यसैनिकांनी कोणकोणते प्रयत्न केले?
४. अण्णासाहेबांना ' माथेरानचा वाघ ' असे का संबोधण्यात आले आहे?
५. अण्णासाहेब कोतवाल यांच्या बालपणातील एक प्रसंग तुमच्या शब्दांत लिहा.
६. चले जाव आंदोलनात भाग घेणाऱ्या देशभक्तांची व नेत्यांची माहिती संकलित करा.
७. तुमच्या गावातील स्वातंत्र्यसैनिकांची माहिती एकत्र करा व एकाचा परिचय थोडक्यात लिहा.

# ३०. विचारधन

## स्वयंसेवी चळवळ

स्वयंसेवी चळवळ म्हणजे काही ध्येयवेड्या लोकांनी उभ्या केलेल्या समाजसेवी कामांची बेरीज किंवा गुणाकार होय. कोणी रस्त्याच्या कडेला तळमळत पडलेला महारोगी पाहिला, संवेदनशील मन अस्वस्थ झाले अन् त्या अस्वस्थ क्षणाच्या बेभानपणावर त्याने महारोग्यांच्या सेवेसाठी आपले सगळे आयुष्य भिरकावून दिले. कोणी चांगला सुखात लोळत होता. त्याला आपल्या देशाची, समाजाची, शेतकरी, शेतमजुरांची आठवण स्वस्थ बसू देईना. दिले सोडून त्याने ते सुख आणि काळ्या माती-दगडांत पेरून घेतले स्वतःला. कोणी गांधीजींना, विनोबांना पाहिलेला, स्वातंत्र्य चळवळीच्या विधायक उपक्रमांना स्वातंत्र्योत्तर काळात स्वयंसेवी आकार देऊ पाहणारा, कोणी श्रमजीवी वर्गाच्या शोषणांतून मुक्ती शोधणारा, कोणी हिंदू संघटनेला वाहिलेला, कोणी देशप्रश्नांच्या एखाद्या अंगाचा अत्यंत थंड, तार्किक विचार करून पद्धतशीर कामाची इमारत उभी करणारा.

अशा अनेक कार्यकर्त्यांनी अनेक वर्षे अथकपणे काम केल्यानंतर स्वयंसेवी क्षेत्राने देशभराच्या विचारवंतांचे आणि योजनाकार मंडळाचे लक्ष वेधून घेतले. या स्वयंसेवी चळवळीच्या कार्यकर्त्यांनी विविध क्षेत्रांमध्ये स्वतःला पेरून घेतले.देशप्रश्नांची,त्यांच्या सोडवणुकीशी आपली बांधिलकी जगून दाखवली. त्या कार्यकर्त्यांनी लौकिक यश, मानसन्मान नाकारून विकासाचा स्वयंसेवी मार्ग चोखाळला. त्यांनी प्रस्थापित आर्थिक, सामाजिक, राजकीय यंत्रणांहून निराळा असा परिवर्तनाचा रस्ता तयार केला. या प्रयत्नांमधून उभी राहिलीय ती स्वयंसेवी चळवळ.

स्वयंसेवी चळवळीच्या या कार्यकर्त्यांनी देशभर जागोजागी आपल्या

स्वयंसेवी संस्थांचा पसारा मांडला. कोणाचा आरोग्य क्षेत्रात, कोणाचा शिक्षण क्षेत्रात, कोणी उद्योग, व्यवसाय, तंत्रज्ञानात तर बरेचजण ग्रामविकासनात, शेतकरी-शेतमजूर चळवळीत, कोणी स्त्री-मुक्ती किंवा स्त्री-शक्ती जागरण चळवळी उभ्या करण्यात स्वतःला झोकून दिले. समाजजीवनाच्या अनेक क्षेत्रांना अनेक अंगांनी स्पर्श करणारी प्रारूपे (मॉडेल्स) उभी राहिली. त्या छोट्या-मोठ्या प्रारूपांमधून राष्ट्रीय आणि सामाजिक समस्यांची सोडवणूक करणारे रस्ते आखले गेले.

या संस्था लोकाश्रयी, लोकसंघटन करणाऱ्या तळागाळाच्या, थेट दऱ्याखोऱ्यांतल्या, खबदाडीतल्या माणसांना बांधणाऱ्या आहेत. त्यामुळे अगदी छोट्या, स्थानिक स्तरावर का होईना परिवर्तन घडवून आणणारी कामे त्यांनी उभी केली. पारावर, पिंपळाखाली, बांधावर, चावडीवर सहज सोप्या पद्धतीने लोकांशी संवाद साधून तळातून नियोजन प्रत्यक्ष अमलात आणता येऊ शकेल, हे दाखवून दिले.

तीन ते चार हजार स्वयंसेवी संस्था देशभर कार्यरत आहेत. एकेका स्वयंसेवी संस्थेने एकेका उत्तराचा रस्ता दाखवणारे रूप रचून दाखवलेय. म्हणजेच अशा संस्थांच्या हजारो समर्पित निःस्वार्थ कार्यकर्त्यांनी मिळून बनते ती स्वयंसेवी चळवळ.

**अविनाश धर्माधिकारी**

**'अस्वस्थ दशकाच्या डायरीतून'**

## मानवतेचे मंदिर

ज्या मंदिरात पाऊल टाकले,की मनुष्य भेदभाव विसरून जाईल; ज्या मंदिरात उभे राहिले,की मी ब्राम्हण, तू मराठा, मी स्पृश्य, तू अस्पृश्य, मी हिंदू, तो मुसलमान, हा ख्रिश्चन. हा बुद्धधर्मीय किंवा कोणी हा भेदभाव नाहीसा होईल; जातीभेद,वंशभेद लयाला जातील असे मंदिर नाही का कुठे? हो, असे मंदिर आहे. अनादिकालापासून ते अस्तित्वात आहे. मानवकोटी

अस्तित्वात येण्याअगोदर ते बांधले गेले आहे. सर्वांचा समावेश करण्याइतके ते भव्य आहे. त्या मंदिरावर चकाकणारा कळस रोज प्रत्येकाला दिसत आहे. त्या मंदिरात शोभणारी दिवाबत्तीची व झुंबराची रोषणाई प्रतिदिनी मंदिराला उजाळा देत आहे. प्रभातकाळी रोज त्या मंदिरात पोवाडे गाणारे भाट हजारो वर्षांपासून कूजन करत आहेत आणि मंदिरातून बाहेर पडणारे तीर्थ सर्व प्राणिमात्रांना जीवन देत आहे.

अशा या भव्य, दिव्य, उदात्त, सर्वव्यापी देवालयाकडे डोळेझाक करून अज्ञानी मुलांनी आपल्या भोळ्या समजुतीकरता बांधलेल्या क्षणभंगुर अशा देवालयाच्या आवारात किती दिवस गुरफटून राहणार ?

अफाट विश्व हेच खरे मंदिर नव्हे काय? या मंदिरात असलेल्या जनता-जनार्दनाची सेवा करण्यास आपण जनतेला शिकवायला हवे.

**माधवराव बागल**

## प्रत्येकाने एक धंदा शिकलाच पाहिजे

प्रत्येकास कोणता तरी एखादा धंदा शिकवलाच पाहिजे. धंदा म्हणजे व्यक्तीस किंवा राष्ट्रास उपयोगी अशा वस्तू निर्माण करणे किंवा अशा क्रिया करणे. जसे धान्य किंवा वस्त्र निर्माण करणे, शस्त्रक्रिया करणे, लढणे, गाणे वगैरे. ज्याचे उपजत गुण ज्या धंद्यात उपयुक्त असतील तो धंदा त्याने शिकावा, असा सामान्य नियम घालता येतो. उपजत गुण वंशपरंपरेने उतरतात. तथापि, या नियमास अपवादही क्वचित दिसून येतात. म्हणून बापाचा धंदा मुलाने शिकावा, असा सामान्य नियम असावा. तथापि, इतर धंदा शिकण्याची आवड किंवा योग्यता कोणात दिसून आली, तर तो शिकण्यास त्यास प्रतिबंध करू नये. कोणता तरी निदान एक धंदा प्रत्येकाने शिकलाच पाहिजे, असा मात्र नियम असावा.

**डॉ. के. ल. दप्तरी**





# ३१. गाणी

## १. माझिया माहेरा जा!

माझिया माहेरा जा! रे पाखरा,
माझिया माहेरा जा!
देते तुझ्या सोबतीला, आतुरले माझे मन
वाट दाखवाया नीट, माझी वेडी आठवण
मायेची माऊली, सांजची साऊली
माझा ग भाईराजा
माझिया माहेरा जा!



माझ्या रें भावाची उंच हवेली
वहिनी माझी नवी नवेली
भोळ्या रे सांबाची भोळी गिरिजा
माझिया माहेरा जा!

अंगणात पारिजात, तिथं घ्या हो घ्या विसावा
दरवळे बाई गंध, चोहिकडे गावोगावा
हळूच उतरा खाली, फुलं नाजूक मोलाची
माझ्या माय माउलीच्या, काळजाच्या की तोलाची
तुझी ग साळुंकी, आहे बाई सुखी
सांगा पाखरांनो, तिचिये कानी
एवढा निरोप माझा
माझिया माहेरा जा!

## २. बेचाळीसच्या आंदोलनाचा पोवाडा

मायमाऊली भारतमाते,
घे पहिला मुजरा ।
स्वातंत्र्याचा उमदा शाहीर,
आला दरबारा ।।१।।

घडण कराया स्वातंत्र्याची,
स्वर्गी जे गेले
वीर हुतात्मे दरबारी तव,
मानाने बसले ।।२।।

मृत वीरांनो तुमची स्फूर्ती,
संचारुन अंगी
आजमितीला तरुण रंगले
पुनरपि रणरंगी ।।३।।

बेचाळिसची क्रांती राहिल,
अमर इतीहासी
प्राणपणाने लढले लाखो,
प्यासी, उपवासी ।।४।।

बेचाळिसच्या लढ्यात मरुनी
अमरपदी गेले
याते तुम्ही वीर मर्द हो
दरबारी सगळे ।।५।।



या दरबारी जागा तुमच्या
खास राखियेल्या,
तुमच्या पायी पायघड्या या,
प्राणाच्या केल्या ।।६।।

वंदेमातरम्—वंदेमातरम्
झाली ललकारी,
बेचाळिसचे विजयी योद्धे
आले दरबारी ।।७।।

स्वर्गलोकिचे वीर करारी,
इथे सर्व जमले,
शाहीरांच्या रसवंतीला
म्हणून स्फुरण चढले ।।८।।

मृत वीरांना करा मंडळी
लक्षवार नमने,
कान करुनी जीवाचे मग
ऐका ही कवने ।।९।।



## ३. समतेचे हे तुफान

ऊठ ऊठ सह्याद्रे, घुमवित बोल मराठी खडे;
समतेचे हे तुफान उठले; उठले सागरकडे.

हीच मराठी जिच्या मुखाने वदली ज्ञानेश्वरी;
शिवबाने तरवार घासली याच मराठीवरी;
हिच्या स्वागतासाठी झडले तोफांचे चौघडे.

टिळक, गोखले, फुले, रानडे, आगरकर वैखरी —
स्वातंत्र्याच्या पाच मशाली जळती वेदीवरी;
ह्या ज्योतीवर दीप पेटवा चला भविष्याकडे.

स्वतंत्रतेचा मंत्र जयांना गर्भामध्ये मिळे;
तेच मराठे आम्ही; आम्ही सह्याद्रीचे सुळे;
स्वराज्यातुनी पुढे चला रे, चला सुराज्याकडे.

दर्याच्या भरतीच्या लाटा महाराष्ट्रअंगना;
कंकणनादा भिउनि तयांच्या शत्रु सोडिती रणा;
वीज माळुनी वेणीवरती त्याही घुसल्या पुढे.

ऊठ खेडुता, पुन्हा एकदा झाडुनिया घोंगडी;
ऊठ मजूरा, पुन्हा मारण्या आघाडीवर उडी;
एकजूट ही पाहुन पडतिल अन्यायाला तडे.



